ये मऱ्हाठियेचिया नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं ।
घेणें देणें सुखचि वरी । हों देईं या जगा ।

—ज्ञानेश्वर.

# अजिंठा

## ( त्रैमासिक )



मार्गदर्शक :—

श्री. प्रा. र. म. भुसारी, एम्. ए. एल्.एल्. बी.

श्री. प्रा. डॉ. ना. गो. नांदापूरकर, एम्. ए. पीएच. डी.

सम्पादक :—

श्री. ग. रा. दंडे, बी. ए. प्रथम

श्री. पां. बा. गुंजोटीकर, एम्. ए. प्रथम.

# या अंकांत—

उस्मानिया विद्यापीठाचे मराठी मंडळ १९५१—५२





गणपत दंडे
बी. ए. (प्रथम)
संपादक



पां. बा. गुंजोटीकर
एम्, ए. (प्रथम)
सह–संपादक

# प्रकाश

वर्ष ३ रें ]  मार्च १९५२  [ अंक १ ला

'प्रकाश' च्या तिसऱ्या वर्षाचा हा पहिलाच अंक वाचकांच्या हातीं तो देतांना एकीकडून आनंद होत आहे तर दुसरीकडून आर्टस कॉलेजेतर शेकडा मराठी भाषाबंधूंना 'प्रकाश' चा हा अंक मिळत नाहीं याबद्दल खेद वाटत आहे. या विषयीं 'आमचें मनोगत' या अंकाच्या शेवटीं आम्ही व्यक्त केलें आहे. हा अंक निघण्यास बराच विलंब झाला याचीं कारणेंहि त्या लेखांत दिली आहेत. या अंकाचें प्रकाशन उशीरा होत आहे हा दोष मान्य करूनहि आतांपर्यंतच्या अंकापेक्षां हा अंक अधिक सुंदर नि मौलिक स्वरूपाचा काढण्याचा प्रयत्न केला आहे हें रसिकांच्या लक्षांत येईलच. शक्यतो विविध प्रकारचे लेख व जवळ जवळ सर्वच वाङ्मयप्रकारांचा परामर्ष घेण्याचा यत्न केला असून अंकाच्या सजावटींत बरीच भर घालण्याचा प्रयत्न केल्याचें सहृदय वाचकांच्या ध्यानांत येईलच. 'प्रकाश' च्या या अंकानें विद्यार्थ्यांच्या लेखनाभिरुचींत-व वाङ्मयसेवेंत थोडी जरी अभिवृद्धि झाल्याचें वाचकांच्या प्रत्ययास आलें तरच आमच्या या सर्व श्रमाचें सार्थक होईल.

मित्रहो, गेल्या वर्षापेक्षां या वर्षी जागतिक संसारांत मोठमोठ्या घडामोडी झाल्या. काश्मीर प्रकरण व कोरियाचें युद्ध शांत होईल काय या विवंचनेंत असतांना इराण व ईजिप्तमध्यें आगीचा भडका उडालेला दिसत आहे. त्यामुळें सर्व जगाच्या शांततेस धोका निर्माण झाला आहे. ब्रिटनमध्यें हुजूर पक्षाच्या विजयानें युद्धप्रिय शक्ति प्रबळ होत आहे व रशिया नि अमेरिका या जगांतील दोन प्रमुख गटांतील संघर्ष टळ-ण्याचीं चिन्हें मुळींच दिसत नाहींत. जगांत शांतता प्रस्थापनेसाठीं भारतानें शक्यतितका प्रयत्न करण्याचा निश्चय केला आहे. सुदैवानें चीन व भारत यांचे स्नेहसंबंध दिवस-दिवस वाढत आहेत व इतर राष्ट्रांची सहानुभूती भारतास मिळत आहे.

भारतांतील सार्वत्रिक निवडणुका संपल्या व आपल्या मायभूमींत आतां खऱ्या लोकराज्याचा उदय होत आहे. भारतासारख्या बहुतांशीं निरक्षर व पाश्चात्य देशांच्या मानानें मागासलेल्या राष्ट्रांत जगांतील ही पहिली मोठी निवडणूक अत्यंत यशस्वीरीत्या पार पडली. सरकारनें निवडणुकीची व्यवस्था चोख व निःपक्षपाती ठेवली असली तरी यशाचें सर्वस्वी श्रेय भारतीय जनतेलाच आहे. मताचें महत्त्व ओळखून बहु-तेक मतदारांनीं आपलें मत योग्य रीतीनें दिलें व अशा प्रकारें प्रजाराज्याचा पाया पडला. नव्वद टक्के मतदार निरक्षर असतां सतरा कोटी मतदारांनीं केलेली निवड इतक्या शिस्तीनें व शांतपणें पार पडूं शकते तर दुसरी नव समाज निर्मितीचीं कामें अशाच संयमानें व जोमानें पार पडतील अशी आशा कां करूं नये? पं. नेहरूंच्या नेतृत्वामध्यें जसें अचूक राजकीय शहाणपण प्रतीत होतें तसेंच त्यांचें आर्थिक धोरण अचूक बनलें तर पुष्कळच प्रगति होईल यांत शंका नाहीं.

यानंतर या अंकांतील निरनिराळ्या ललित लेखांचें थोडक्यांत दर्शन करवून देतो.

श्री. पद्माकर डावरे यांची 'विरलेली मृत्युछाया' ही लघुकथा हे या अंकाचे पहिले आकर्षण आहे. श्री. डावरे यांना महाराष्ट्रांतील प्रमुख मासिकांतून प्रसिद्धि मिळत आहे हे सर्वांना माहिती असेलच. नव्या लघुकथेची सुरवात प्रियकराने प्रेयसीसाठी लिहिलेल्या पत्राने केल्यामुळे जयंतच्या जीवनाचा शोकांतिका घडणार होती पण तिला लेखकाने आनंदपर्यवसायी करण्यांत बरेच कौशल्य दाखविले आहे. शेवटपर्यंत वाचकांची उत्कंठा टिकून रहाते हेच या लघुकथेच्या यशाचे मुख्य कारण आहे.

गुरुवर्य डॉ. नांदापूरकर यांची कविता त्यांच्या प्रेमळ, हळव्या व निसर्गाशीं तादात्म्य पावणाऱ्या वृत्तीची साक्ष देत आहे तर प्रा. श्रीधर कुलकर्णी यांचा संशोधनपर लेख त्यांच्या गाढ व्यासंगाचा नमूना आहे. श्री. यशवन्त कानिटकरांनीं माझ्या विनंतीस मान देऊन आपल्या 'दोन रुबाया' प्रकाशित करण्यास दिल्याबद्दल 'प्रकाश' त्यांचा उपकृत राहील.

श्री. भालचंद्र कुलकर्णी यांची ऑल इंडिया रेडिओच्या हैद्राबाद केंद्राने ध्वनिझालेली नाटिका हे या अंकाचे वैशिष्ठ्य आहे. 'प्रकाश' मध्ये पहिल्यांदाच एकनाटिका प्रकाशित होत आहे. श्री. पां. वा. गुंजोटीकर यांचा लघुनिबंध त्यांच्या चोखंदळ बुद्धीचे दर्शन घडवीत आहे व ते एक यशस्वी लेखक होण्याच्या मार्गावर आहेत हे सुचवीत आहेचे त्यांचे बंधू श्री. वसंत गुंजोटीकर यांचा लेख त्यांच्या अभ्यासू वृत्तीची साक्ष देत आहे.

लेखक मित्रहो, भाषेची सेवा, समाज सुधारणा व लोकराज्याचा मान वाढविण्यासाठींचआपली लेखणी आपण वाहिली पाहिजे मातृभाषेला यशाच्या शिखरावर आरूढ करीतअसतांनाच आपल्या राष्ट्रांत लोकशाही समाजवादाची स्थापना करण्यासाठीं इतरा प्रमाणेंच लेखकांनींहि आपला वांटा उचलला पाहिजे.

'प्रकाश' च्या संपादकपदीं माझ्यासारखा एक ज्युनिअरचा विद्यार्थी निवडून येणें ही घटना अपूर्व असली तरी 'प्रकाश' च्या आतांपर्यंतच्या परंपरेस अनुसरून त्याच्या मौलिकतेत कशी भर टाकून अशी सारखी विवंचना लागून होती. माझा प्रयत्न कितपत यशस्वी झाला आहे ते प्रेमळ वाचकच ठरवतील.

या ठिकाणीं मला प्रा. र. म. भुसारी व डॉ. ना. गो. नांदापूरकर या गुरुद्वयांनीं मार्गदर्शन करून ऋणी करून ठेविले आहे हें सांगणें आवश्यक वाटतें. तसेंच प्रा श्रीधरराव कुलकर्णी यांनीं वेळोवेळीं जो सल्ला दिला त्याबद्दल मी त्यांचा हार्दिक आभारी आहे. हाअंक शक्यतितका सुबक निघत आहे याचे सर्वस्वी श्रेय माझ्या गुरूंनाच आहे. गुरु कृपेचा थोरवी–

म्हणोनि माझें नित्य नवें । श्वासोश्वासहि प्रबंध होवावें
श्रीगुरुकृपें काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे

या ज्ञानदेवांच्या शब्दांत सांगून त्याविषयीं मी मौन धारण करतो. याशिवाय ज्या ज्या लेखकांनीं आपल्या लेखन कलाकृतींनीं हा अंक सजविला त्यांना हार्दिक धन्यवाद. अंक सजविण्याचें सर्व श्रेय त्यांचेंच होत.

यानंतर श्री. जगन्नाथराव वर्दापूरकर, व्यवस्थापक, जयहिंद मुद्रणालय यांचे आभार मानल्यावांचून राहवत नाहीं. मोठ्या आपुलकीनें व हिरीरीनें त्यांनीं हा अंक सजवला याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार.

वाचकांना हा अंक रुचेल व ते आमची सेवा रुजू करून घेतील अशी आशा आहे.

# मराठी संघ

**आमच्या** संघाचें नांव आतां आर्टस कॉलेज मराठी संघ आहे! आमच्या संघाच्या नांवामागें आर्टस् कॉलेज ही पुस्ती जोडण्यांत आली व त्या योगें आम्ही आमच्या अनेक इतर कॉलेजांतील भाषाबंधूंना अंतरलो. आर्टस् कॉलेज युनियनची नवी घटना अशी कांहीं बनविली गेली आहे की प्रादेशिक भाषेंतील सर्व विद्यार्थी एकत्र येऊं नयेत आणि त्यांच्या संघटनेवर आघात पडून त्या भाषांना योग्य तें स्थान मिळूं देऊं नये. घटनेंतील १९ व्या कलमान्वयें प्रत्येक संघाचे निदान शंभर तरी सभासद असावेत आणि हे सभासद फक्त आर्टस् कॉलेजांतीलच असावेत. एवढेच नाहीं तर पुढें २० व्या कलमांत हे महान (?) घटनाकार म्हणतात की प्रत्येक संघाचा एक उपाध्यक्ष व चिटणीस राहील व आर्टस् कॉलेज युनियनचा अध्यक्षच सर्व संघांचा अध्यक्ष राहील. प्रादेशिक भाषा व इतर विषयांचा गंध नसलेला हा माणूस आमच्या कार्यक्रमांतून व सभांतून अध्यक्षस्थानीं स्थानापन्न होऊन काय झोंपा काढणार? प्रत्येक संघाला स्वतंत्रपणें कार्य करण्यास वावच राहिला नाहीं. या सर्व कारणांनीं विद्यार्थ्यांत तीव्र असंतोष पसरला. घटनेंत दुरुस्ती करण्यासाठीं दोन महिने भांडणांतच गेले. सायन्स, इंजिनियरिंग, अॅग्रिकल्चर, मेडिकल, ट्रेनिंग-कॉलेज इत्यादि सर्व कॉलेजांतील शेकडो मराठी विद्यार्थ्यांपासून संबंध तोडण्यासाठीं रचिला गेलेला हा डाव उघडकीस आला. मराठी संघाचें अस्तित्व धोक्यांत आलें होतें. शेकडोंनीं सभासद असणाऱ्या संघाचे सभासद दोनशेपेक्षां जास्त राहिले नाहींत. कानडी संघावर तर कुऱ्हाडच कोसळली होती पण बिचाऱ्या कन्नडिगांनीं त्यांच्या नेहमीच्या संवयींप्रमाणें धडपड करून कसेबसे शंभर सभासद गोळा केले. मराठी संघावर आज ना उद्या हा प्रसंग येणार आहे. मराठवाड्यांत दोन पदवी परीक्षेपर्यंत वर्ग असलेलीं कॉलेजें निघाल्यामुळें उस्मानिया विद्यापीठांत मराठी मातृभाषी विद्यार्थ्यांची संख्या दिवसेंदिवस कमी होत आहे. तेव्हां विश्वविद्यालयाच्या आवारांतील सर्व कॉलेजांतील मराठी मातृभाषिकांनी आपल्या संघटनेस बाध आणूं न देण्यासाठीं संयुक्त आघाडी लढविली पाहिजे. तरच आमच्या संघटनेचा तरणोपाय आहे. यावर्षी आलेल्या कटु अनुभवावरून पुढील वर्षी आमचे भाषाबंधू अनेक वर्षांपासून चालत आलेल्या आपल्या संघटनेस प्रभावी करण्यासाठी व त्यांच्या एकतेस बाध आणण्याकरितां रचला गेलेला डाव उधळण्यासाठीं योग्य तें पाऊल टाकतील अशी सूचनावजा विनंती करून यावर्षी मराठी संघानें (आर्टस् कॉलेजच्या.) केलेल्या कार्याचा अहवाल सादर करतो.

संघाच्या निवडणुका अगदींच उशीरानें म्हणजे दिनांक ७-९-१९५१ रोजीं झाल्या व नव्या घटनेप्रमाणें खालील पदाधिकारी निवडून आले.

१ श्री. अंबादास अंदूरकर (बी. ए. अंत्य)
उपाध्यक्ष

२ श्री. कुलकर्णी (बी. ए. अंत्य)
चिटणीस

३ श्री. ग. रा. दंडे (बी. ए. प्रथम)
उपचिटणीस

वर्ग-प्रतिनिधी :—

एम. ए. (अंत्य) श्री. चंद्रशेखर कपाळे
एम. ए. (प्रथम) श्री. पांडुरंग गुंजोटीकर
बी. ए. (अंत्य) श्री. विठ्ठल कठारे
बी. ए. (प्रथम) श्री. लक्ष्मण देशपांडे
बी. कॉम. (अंत्य) श्री. वसंत गुंजोटीकर
बी. कॉम. (प्रथम) श्री. अनंत हुपरीकर

संघाचें उदघाटन स्थानिक स्वराज्य व आरोग्य मंत्री नामदार फूलचंद गांधी यांच्या हस्ते दिनांक ११-९-५१ रोजीं झाले. त्यांनीं युनिव्हर्सिटीच्या प्रांत भाषाविषयींच्या विशेषत: मराठी भाषेविषयींच्या उदासीन वृत्तीचा सखेद उल्लेख करून सर्व प्रांत भाषिकांनीं आपल्या पायावर उभें राहिल्याशिवाय तरणोपाय नाहीं असे विचार प्रगट केले. मराठवाड्याच्या उज्वल वाङमय परंपरेचा उल्लेख करून डॉ. नांदापूरकरांसारखीं झांकली माणकें अजूनहि तेथें उपलब्ध होऊं शकतात तेंव्हा मराठी विद्यार्थ्यांनीं आपल्या मनांतील न्यूनगंड झटकून टाकावा असा उपदेश नामदार मंत्र्यांनीं केला.

दिनांक २२-१०-१९५१ रोजीं डॉ. नांदापूरकर यांच्या अध्यक्षतेंखालीं नवकाव्य प्रगतिपथावर आहे काय? ' या विषयांवर साधक बाधक चर्चा झाली. बऱ्याच विद्यार्थ्यांनीं चर्चेत भाग घेतला. श्रोत्यांनीं नवकाव्य प्रगतिपथावर आहे या बाजूनें निर्णय दिला.

दिनांक९-११-१९५१रोजीं आमच्या विद्यापीठांत मराठीचें प्राध्यापक म्हणून नव्यानें नेमणूक झालेले प्रा.श्रीधरराव कुलकर्णी एम्.ए. यांचें ' नवसमाजाचें साहित्य ' या विषयावर विचार-परिप्लुत भाषण झालें. संक्रमण अवस्थेंतून जात असलेल्या आपल्या राष्ट्राला आज ध्येयवादी व विशाल दृष्टिकोनांतून निर्माण झालेल्या साहित्याची अत्यंत आवश्यकता आहे असें त्यांनीं प्रतिपादिलें.

दिनांक १७-११-१९५१ रोजीं निजाम कॉलेजांतील मराठीचे प्राध्यापक श्री. वि. पां. देऊळगांवकर यांचें ' वाङमयीन मूल्यें आणि सामाजिक मूल्यें ' या विषयावर आमच्या मराठी विभागाचे प्रमूख प्रा. रघुनाथराव भुसारी यांच्या अध्यक्षतेखालीं विद्वत्ताप्रचुर असें भाषण झालें. वाङमयांतील कलावादी व जीवनवादी विचार प्रवाहांचें मूल्यमापन करून त्यांनीं दोन्ही विचार-प्रवाहांतील अतिरंजिततेंविषयीं विरोध प्रगट केला.

यावर्षी आंतरमहाराष्ट्रीय कीर्तीच्या विचारवंतांचा व साहित्यिकांचा फारसा लाभ हैद्राबादेला झाला नाहीं. अर्थातच संघाच्या कार्यक्रमांत त्यांचा अनुल्लेख जाणवण्यासारखा आहे.

**उपचिटणीस.**

# आमची अन्न समस्या

लेखक :— **वसंत गुंजोटीकर**, बी. कॉम अन्त्य.

आपली सर्वात निकडीची जर कोणती समस्या असेल तर ती अन्न समस्या होय. भारताचा अन्नप्रश्न हा जीवन मरणाचा प्रश्न आहे. या प्रश्नाच्या यशापयशतेवर या महान राष्ट्राचें भवितव्य ठरले जाणार आहे. १९५२ नंतर अन्नाचा एकहि कण आयात केला जाणार नाहीं असा निर्धार सरकारने केला होता. पण या वर्षात सुमारें ५० लक्ष टन अन्नधान्य आयात करावे लागेल असा सरकारी निरीक्षकांचा अंदाज आहे. ज्या साली एकहि कण आयात केला जाणार नव्हता त्याच सालीं मागील वर्षापेक्षां ठोकळ मानानें दुप्पट आयात करावी लागणार हा दैवदुर्विलास नव्हे काय ? याचा स्पष्ट अर्थ असा कीं, सरकारनें जनतेची फसवणूक केली. १९५२ पर्यंत स्वयंपूर्ण होणे ही एक अशक्यप्राय घटना आहे असें अर्थशास्त्रज्ञ आणि तज्ज्ञ सांगत असताना सरकारनें आपला हेका कायम ठेवला. याचा परिणाम जो व्हावयाचा तो झाला.

आपला अन्नप्रश्न येवढा हातघाईवर येण्याचीं कारणें म्हणजे देशाची झालेली फाळणी, घटते उत्पादन आणि वाढती लोकसंख्या हीं होत. अन्नप्रश्नाच्या दोन बाजू आहेत. पहिली उत्पादनाची आणि दुसरी वितरणाची. (Distribution) घटत्या उत्पादनाबरोबरच उत्पादित धान्याचें अयोग्य वाटप आणि नियंत्रणांतील शिथिलता हीं दोन कारणेंहि तितकींच महत्वाचीं आहेत. घटत्या उत्पादनाच्या कारणांचो नामावळी आता बहुतेक सर्वांना पाठ झाली आहे. तसेंच अधिक धान्योत्पादन करावयाचें झाल्यास कोणती उपाययोजना करावी लागेल या विषयींहि एक दीर्घ व्याख्यान झोडून द्यावयाची तयारीहि पण आपल्यापैकीं बऱ्याच जणांची आहे. म्हणून प्रस्तुत निबंधांत प्रामुख्यानें धान्याच्या वाटपाविषयींच विचार केला आहे.

भारतांत निश्चित किती अन्न पैदास होतें याची आकडेवारी उपलब्ध नसतें. आपली आकडेवारी खरेपणा व अचूकपणा यापेक्षां अनिश्चितता आणि अविश्वासार्हता (Unreliability) या गुणाकरितां प्रसिद्ध आहे. आंकडेवारी जमविण्याची आपली पद्धति अगदीं अशास्त्रीय आहे. याची सत्यता ग्रामीण विभागांत राहणाऱ्यांना तात्काळ पटेल. आंकडेवारी जमविण्यास मूळ सुरवात खेडेगांवापासून होते. सरकार गांवातील कुळकर्ण्यांनीं दिलेल्या आगामी पिकांच्या अंदाजावर विसंबून राहते. पण ही माहिती देणारा इसम आपला पुढील वसूलीचा ( Procurement) त्रास आणि जबाबदारी वाचविण्याकरितां नेहमींच पिकांचे अंदाज चुकीचे आणि खोटे देत असतो ही जगजाहीर झालेली गोष्ट आहे. ह्याचा परिणाम म्हणजे सरकारी तज्ज्ञांनीं बांधलेली अनुमानें पत्याच्या बंगल्या-

प्रमाणें ढासळून पडतात. हा मूलभूत दोष नाहींसा करण्याचा सरकारकडून फारसा प्रयत्न अद्यापि तरी झालेला नाहीं. तसा प्रयत्न होणार की नाहीं हें आज सांगणें कठीण आहे. जोपर्यंत उत्पादनांतील निश्चित वाढ अथवा घट कळ-ण्यास मार्ग नाहीं तोंपर्यंत कोणतीहि उपाय-योजना यशस्वी होणें शक्य नाहीं.

दुसरा महत्त्वाचा दोष म्हणजे नियंत्रणां-तील शिथिलता होय. अन्नधान्याच्या नियंत्रणा-खाली एकंदर ८० प्रतिशत जनता आहे. दर डोई (Per head) दर रोज १२ औंस शिधा दिला जातो. तो अगदीं अपुरा म्हणजे शरीरास लागणाऱ्या अन्नापैकीं फक्त ५२ टक्के इतका आहे. प्रत्येक इसम १२ औंस शिध्यावरच भागवतो काय? अनुभव याच्या उलट आहे. प्रत्येक इसम दर रोज कमीत कमी १६ ते १८ औंस अन्न खातो ही गोष्ट स्पष्ट आहे. असें आहे तर मग तो जादा अन्न कोठून आणतो? दोन उपायांनीं तो अन्न प्राप्त करून घेऊं शकतो. बनावटी शिधापत्रें (Ghost Ration Cards) काढून आणि काळाबाजार करून. पहिला प्रकार अगदी अल्प प्रमाणात आहे. दुसरा प्रकार मात्र सर्रास चालूं आहे. दुसऱ्या प्रकारास वास्तविक काळाबाजार म्हणून संबोधणें अयोग्य आहे. कारण तो अगदीं खुलाबाजार आहे. (whiter than the white market) याविषयीं सरकारनेहि कबुली अनेक वेळां दिली आहे. उत्पादन घटत आहे अथवा उत्पादन अपेक्षे-प्रमाणें होणार नाहीं अशी असत्य माहिती सरकारला पुरवली जाते आणि अशा प्रकारे वास्तविक उत्पादन आणि सरकारी आंकडेवारी वर आधारलेलें उत्पादन यामधील तफावत काळयाबाजारांत वेश करते. या घटनेस सर्वात जास्त जबाबदार जर कोण असेल तर सरकार होय. नियंत्रणाच्या नियमाचा भंग करणाऱ्यास कडक शासन करणे हा सरकारचा धर्म आहे. नियंत्रणांची अंमलबजावणी कडक नसल्यामुळें नियंत्रणविषयक निर्बंध धाब्यावर बसवून व्यापारी वर्ग अमाप नफा मिळवीत आहे. नियंत्र-णांची यंत्रणा सुधारून काळाबाजार बंद केल्यास तेथें विकले जाणारे अन्न सरकारला उपलब्ध होऊन जनतेस तें योग्य दरांत मिळूं शकेल. ही गोष्ट करणें आपल्या अधिकाराच्या जोरावर मद्यपान बंदी नि इतर नीति विषयक कायद्यांची कडक अंमलबजावणी करणाऱ्या सरकारला सहज शक्य आहे. मात्र हा सरकारच्या इच्छेचा प्रश्न आहे.

वसूली वाढविण्याकरितां सरकारने धान्याचे वसूलीचे भाव ५ ते ३५ टक्क्यापर्यंत वाढविले आहेत सरकारी भाव आणि खुल्याबाजारातील भाव यामधील तफावत जास्त असल्यामुळें वसूली बरोबर होत नसे आणि ती जास्त व्हावी नि सरकारला धान्य विकण्यास चालना मिळावी म्हणून ही वाढ करण्यांत आली आहे असे स्पष्टी-करण सरकारकडून देण्यांत आले आहे. खोल विचारांती ही कल्पना चुकीची आहे हें चटकन् ध्यानांत येईल. ते असे. वसूलीचे भाव वाढवि-ल्यावर विक्रीचे भाव वाढवावे लागतील हे उघड आहे. यामुळे सर्वच पदार्थांचे भाव वाढतील. राहणीचा खर्च वाढेल. शहरांतील औद्योगिक कामगार भाववाढीमुळें जादा पगाराची मागणी करतील. त्यांच्या वेतनांत वाढ झाल्यास उत्पादित मालहि महाग होईल. चलनवाढ जास्त होईल. अशा रीतीने हे सर्व विनाशक वर्तुळ कोठेंच संपणार नाहीं. शेतकऱ्याजवळ वर वर दिसणारा जादा पैसा इतर वस्तू उदा. कापड, पोलाद इत्यादि महागल्यामुळे टिकून राहणार नाहीं. या-वरून भाववाढीमुळे वसूलीस चालना मिळेल, ही कल्पना किती भ्रामक आहे हें दिसून येईल. या-शिवाय नियंत्रणांची शिथिलता आणि काळा-बाजार बंद न झाल्यास काळयाबाजारांतील भाव आणखीन् वाढण्याचा संभव आहे. यामुळें सरकारी

भाव आणि काळयाबाजारांतील भाव या दोहोंतील तफावत कायमच राहून सरकार जी धान्यवसूलीस चालना देऊं पहात आहे ते एक मृगजळच ठरेल. सरकारला चालना द्यावयाचीच असेल तर जादा धान्य सरकारास विकणाऱ्यांना बक्षीस द्यावे. बक्षीस नाण्याच्या स्वरूपांत न देता शेतीस लागणारी आवश्यक ती अवजारे, खत, उत्तम बी बियाणे इत्यादि स्वरूपांत द्यावे. अशा रीतीनं शेतकऱ्यांचा गौरव केल्यास राष्ट्रभक्तीची जी सुप्त भावना प्रत्येक मानवांत स्वभावतः असते तिला चालना मिळून एकंदरीत देशाचा फायदा होईल.

पंच-वार्षिक योजनेमध्ये वसूलीस चालना देण्याकरितां धान्याचे भाव वाढविण्याऐवजी हळू हळू सर्व उपभोग्य पदार्थांचे भाव (Consumer goods) स्थिर करून ते खालच्या पातळीवर आणण्याचे प्रयत्न केले जातील असें स्पष्ट म्हटले होते. किंमतीविषयक धोरणावरच पंच-वार्षिक योजनेचे भवितव्य अवलंबून आहे असे सांगतांना योजनाकार म्हणतात. "किंमतींतील बदल हा केवळ आंकड्यांतील आणि अर्थविषयक अंदाजांतील फरक अथवा बदल हा नसून तो योजनेचा मूळ तोंडवळाच साफ बदलून टाकणार आहे" ( A change in prices does not mean merely a mechanical revision of the financial estimates included in the Plan. It changes very prospective of the plan ) पंच-वार्षिक योजना अमलांत येण्यापूर्वीच त्यांत ग्रथित केलेल्या मूलभूत धोरणास

काळयाबाजारांत धान्य निर्धास्तपणें विकले जाऊं शकतें हे वसूली अपेक्षेप्रमाणें न होण्यास जसें एक कारण आहे तसेंच अनिश्चित वसूलीविषयक धोरण हें दुसरें कारण आहे. सरकारच्या वसूलीविषयक धोरणांत एकसूत्रीपणा नाहीं. प्रत्येक हंगामाच्या वेळी धोरण बदलले जाते. यामुळे शेतकऱ्यांस तें धोरण कळणें अशक्य होते. याशिवाय कांहीं विशिष्ठ लोकांना (असे लोक मोठे जमीनदार असतात) वसूलीचे अधिकारी वसूलींत विनाकारण सूट देत असल्यामुळे छोटया शेतकऱ्यांना सरकारविषयीं अविश्वास आणि अनास्था वाटते. परिणामतः त्यांच्याकडून अधिक धान्योत्पादनास आणि अधिक धान्य वसूलीस आवश्यक त्या प्रमाणांत सहकार्य मिळत नाही. 'अधिक धान्य पिकवा' मोहिमेचें लोण शेतकऱ्यापर्यंत पोंचलें नाहीं. त्याचा प्रचार फक्त शहरात आणि सुशिक्षित जनतेमध्येच झाला आहे. खरा अन्नदाता जो शेतकरी, तो अजून अज्ञानाच्या अंधःकारांत चांचपडत पडला आहे.

नियंत्रणें व तद्विषयक बंधनें ही शेतकऱ्यांना अडवणुकीची आणि तापदायक वाटतात. आतांपर्यंत सरकारकडून नियंत्रणामागील उद्देश नि त्यांची निकड ही समजावून सांगण्याचा प्रयत्न फारसा झाला नाहीं. प्रस्तुत भयानक परिस्थितीची जर कल्पना दिली तर आपला शेतकरीवर्ग सहकार्य आणि सहाय्य करणार नाही असे कोणीहि म्हणूं शकणार नाही.

जोपर्यंत वरील दोष दूर केले जाणार नाहींत तोपर्यंत जनतेस सरकारविषयीं विश्वास

*

# नटीचा





# मुलगा

लेखक :— **भालचंद्र कुलकर्णी**, बी. अेस्. सी. (कृषी) अन्त्य.

(रात्रीची वेळ. सोसाटयाचा वारा सुटलेला असतो. आकाशांत ढग गरजत असतात. इतक्यांत वीज कडाडते.)

माया – अगबाई ! पाऊस येणार वाटतं ? शाम येणार तरी केव्हां ?

सारंग – माया, तो आतां बहुतेक येणार नाहीं. रात्र बरीच झालीय. जा तूं जाऊन झोंप आतां.

माया – तो घरीं येणार नाहीं ! मग रात्र कुठे घालवील तो?

सारंग – हूं ! अशा कित्येक रात्रीं तो घरीं नसतो.

माया – अगबाई ! अन् त्याचं तुम्हाला कांहींच वाटत नाहीं ?

सारंग – हूंऽ. रोजचंच आहे ते. मला त्याची चांगली संवय झालीय आतां.

माया – पण मला आतां मुळीच धीर धरवत नाहीं. त्याला कधीं पाहीन असं झालंय मला.

सारंग – कां ? उद्यां भेट कीं. दहा वर्षांत एक

सारंग – उद्यां आपण सविस्तर बोलू. तूं प्रवासानें बरीच थकलेली दिसतेस. जा. वर जाऊन विश्रांति घे.

(इतक्यांत बाहेरून दार ठोठावलें जातें.)

तो आला वाटतं शाम. उघड बरं दरवाजा.

( दार उघडल्याचा आवाज. दोन मवाली प्रवेश करतात.)

माया – अगबाई !

शंभू – कुठं आहे तुमचा शाम ?

सारंग – कोणरे तुम्ही ?

माया – दिसतात कुणी टारगट मवाली.

बळी – मवाली ! कोण मवाली, तुमचा शाम कां आम्ही ?

सारंग – हूं, तर तुम्हीच ते शामचे मित्र. बरीच झोकलेली दिसतेय आज.

बळी – अजून झोकलेली नाहीं. पण इथून अड्डया-वरच जायचंय.

शंभू – उगीच बोलण्यांत वेळ घालवं नका. शाम

बळी – तो आमच्याशीं जुगार खेळला अन् त्यांत हरला.

शंभू – अन् आमचे पैसे दिल्याबिगर इकडे तो तसाच पळून आलाय.

माया – थांबा भामटयांनो, आतां मी पोलीसला फोन करते अन् तुम्हाला तुरुंगाचा रस्ता दाखविते.

शंभू – तुरुंगाची भीति कुणाला दाखवितां बाईसाब. तुरुंगाला आम्ही सासुरवाडी समजतो.

बळी – पण जर तुमच्या शामला तुरुंगांत डांबलं तर तुमच्या अब्रूचे धिडवडे निघतील.

शंभू – आम्हा आजपर्यंत शामला हजारो वेळां तुरुंगांत पाठवलं असतं. पण...मायादेवी तो तुमचा मुलगा आहे म्हणून आम्ही गप्प बसलो होतो.

माया – (एकदम) थांबा, किती रुपये हरला शाम आज ?

शंभू – अडीच हजार.

सारंग – अडीच हजार !

शंभू – विचारा पाहिजे तर बळीला. कारे बळी.

बळी – तर... तर... अहो एक दोन जास्त पण कमी नाहींत.

( माया पर्समधून अडीच हजार रुपये काढते. )

माया – हं, हे घ्या. अन् चट्दिशी चालते व्हा इथून.

बळी – रामराम बाईसाब, ओळख ठेवा आमची. अरे शंभू,पुढील गुरुवारी इथं मायादेवी-चा सिनेमा लागणार आहे आपण दोघं [illegible] बघया तो खेळ.

सारंग – काय करायचं होतं कळवून; तुम्हाला वेळ तरी होता का माझीं पत्रं वाचायला?

(दरवाजा उघडल्याचा आवाज. शाम येतो)

माया – कोण ! शाम ! कधीं आलास तूं ?

सारंग – अग तो बागेंतून घरांत शिरला असेल. नेहमीचंच आहे त्याचं तें.

माया – शाम...

शाम – कोण...कोण तुम्ही ?

माया – मी...मी तुझी आई.

शाम – (तिरस्कारानें) माझी आई, हं !

माया – खरंच तूं ओळखत नाहींस मला ?

शाम – हं ! तुला कोण ओळखत नाहीं ? माया-देवी, आज रस्तोरस्तीं, गल्लोगल्लीं तुझे फोटो लागले आहेत. प्रत्येकाच्या जिभे-वर तुझें नांव आहे. असं पाहतेस काय माझ्याकडं टक लावून.

माया – शाम ... आतां...

शाम – (मध्येच) थांब, मला माहीत आहे, तू मला काय विचारणार आहेस ते. तू पाहिलेलं अन् एकलेल सर्व खरं आहे.

माया – नाहीं अजून माझ्या कानावर विश्वास बसत नाहीं.

शाम – नाहीं तर अजून ऐक. मी उनाड आहे, गुंड आहे, नेहमीं वाईट संगतींत राहतो, इतकंच काय पण मी चोऱ्या करतो.

माया – बोलूं नकोस एक शब्द पुढें. शाम तूं हें काय करीत आहेस !

शाम – ( खोचून तिरस्कारपणानें ) मला माहीत

शाम – पण तुम्ही माझ्या कारभारांत लक्ष घाल-ताच कां? तूं कोणत्या बोलपटांत काम करतेस, कां करतेस याची मी आजपर्यंत कधीं चौकशी केलीय का?

माया – हा आमच्या नांवलौकिकाचा प्रश्न आहे.

शाम – हं, तर तुमच्या नांवलौकिकासाठीं मी चांगलं वागलं पाहिजे. !

माया – आमच्या नांवलौकिकाचें राहूं द्या बाजूला. तुझ्या भविष्याबद्दल तुला कांहींच वाटत नाहीं?

शाम – माझं भविष्य! (हंसतो) एका गुंडाचें भविष्य, एका दारूड्याचें भविष्य, खरो-खर तुमच्यासारख्या मोठ्या माणसांनी असा वेडपट प्रश्न विचारावा हंऽहंऽ (हंसतो)

सारंग – जाऊं दे माया, तो आपलं कसचं ऐकतोय.

माया – शाम, तूं असं करू नकोस. तूं माझं जीवन आहेस

शाम – मी अन् तुझं जीवन (हंसतो)

माया – (रागानें) शाम, मी मघापासून पहात आहे, मला तूं सारखं टोचून बोलत आहेस. मातृहृदय कां आपल्या मुलाचें वाटोळं झालेलें सहन करील? मी तुझी आई नाहीं कां?

शाम – हा प्रश्न मला विचारण्याऐवजी आपल्या मनाला विचार. आई हा शब्द उच्चार-ण्याचीसुद्धां पात्रता तुझ्या अंगीं नाहीं.

शाम – हीच तुझ्या चुकीची सुरुवात. आईच्या प्रेमाची भरपाई अशी पैशानं झाली असती तर आज जगाचा इतिहास कांहीं वेगळा झाला असता. आईचं प्रेम म्हणजे अमृत, अमृताची कधींच खरेदी विक्री होऊं शकत नाहीं.

माया – माझी एकटीची चूक जर तुझ्या या स्थितीस कारणीभूत असेल तर अजून मी माझी चूक सुधारण्यास तयार आहे.

शाम – आतां काय त्याचा उपयोग! मी आतां इतका पुढें गेलो आहे कीं तेथून परतणें शक्यनाहीं मला. ज्यावेळीं मी 'आई आई' म्हणून रात्रंदिवस टाहो फोडीत होतो, तुझ्यासाठीं तळमळत होतो, त्यावेळीं तूं एकदां जरी माझ्या हांकेला ओ दिली असतीस तर मी आजया स्थितीला कशाला पोहंचलो असतो?

माया – म्हणजे! या सर्व गोष्टींना मी कारणी-भूत आहे?

शाम – हो मी गुंड झालो. मी दारूडा झालो. त्याला सर्वस्वी तूं जबाबदार आहेस. वीस वर्षापूर्वीचा काळ आठवून बघ, मुलगा म्हणून तुला माझें कधींच भूषण वाटले नाहीं. उलट माझा जन्म म्हणजे फार मोठा अडथळा वाटला तुला. माझ्या पालनपोषणांसाठीं तूं लठ्ठ पगाराच्या चार दाया ठेवल्यास. पण त्या माझ्या कशाप्रकारें सांभाळ करतात याची चुकूनहि कधी चौकशी केली नाहीस. हें बाईट अन हें [illegible] कोणीच

माया – शाम......तूं......

शाम – हो मी! पुढं मी मोठा झालो. माझ्या-जवळ पाण्यासारखा पैसा येऊं लागला. त्यावेळीं पुष्कळ जण माझे मित्र बनले. त्यांनी मला वाटेल त्या घाणेरड्या संवयीं लावल्या. अन् त्याचवेळीं मला पिण्याची संवय लागली.

माया – (रडकुंडीस येऊन) नको बोलूस शाम पुढं.

शाम – अन् तुम्हाला वाटतं शाम उनाड आहे. गुड आहे. पण माझ्या हृदयांत काय जळत आहे याचा तुम्ही कधीं विचार केला आहे का? मला काय सभ्य माणूस म्हणून जगण्याची इच्छा नाहीं? तुम्हाला काय वाटतं मी फार सुखी आहे? मला माहीत आहे मी कोणत्या आगींत जळत आहे ते. पण त्याला आतां इलाज नाही. अर्धा मद्याचा प्याला घतलेल्या मनुष्या-ला तो सबंध घशाखालीं उतरवावाच लागतो. स्वतःचा नाश पाहण्यासमुद्धा मनुष्याच्या अंगीं फार मोठं धैर्य असावं लागतं (हसतो) पुष्कळवेळा मला असं वाटतं कीं मला जन्म दिल्याबरोबर तू मेली असतीस तर फार बरं झालं असतं. आई! नुसता जन्म देऊन कोणतीहि स्त्री आई होऊं शकत नाहीं. तिला आपल्या मुलासाठी जन्मभर वाटेल त्या खस्ता खाव्या लागतात, त्यांचीं दुखणी काढावी लागतात, आपल्या रक्ताचं पाणी करावं लागतं, वेळप्रसंगीं आपल्या अपत्यासाठी प्राणाचेंसुद्धा दान करावें लागतें. सांग, यापैकी तू माझ्यासाठीं काय केलं आहेस? गेल्या वीस वर्षांत तूं एकदा-तरी माझ्या आठवणीनं व्याकुळ झालीस का? एकदातरी प्रेमानं तूं मला आपल्या पदराखालीं घेतलंस का? एकदातरी तुझा जीव माझ्यासाठीं कासावीस झाला का? (बेफामपणें) सांग, सांग, तूं माझ्यासाठीं थोडा जरी त्याग केला असतात तरी आज मी या स्थितीला पोहंचलो नसतो समजलं. गुंड झालो ते तुझ्यामुळं, मी बहकलो ते तुझ्यामुळं, अन् मी दारूड्या बनलो तेहि तुझ्यामुळं.

माया – (रडत) बस्स! बस्स! शाम कोणत्या पापाची शिक्षा देत आहेस तूं मला? तुझे सर्व शब्द कढत लोहरसाप्रमाणें माझ्या कानांत शिरत आहेत. तुझा प्रत्येक शब्द माझें हृदय छिन्न विछिन्न करून टाकीत आहे. शाम ऽऽ!

शाम – (मध्येच) पुरें झालं तुझं हें नाटक!

सारंग – शाम, यांत तिचा कांही दोष नाहीं. केवळ माझा मूड म्हणून ती या धंद्यांत पडली, तुझ्या जन्मापूर्वी मला पैसा मिळविण्याचा भयंकर नाद होता. माझी महत्वाकांक्षाच होऊन बसली होती ती. त्यामुळें तुझ्या आईकडे लक्ष देण्यास मला मुळींच सवड झाली नाहीं. ती फार मानी नि महत्वाकांक्षी आहे. तिने माझ्यावर चिडून माझ्या महत्वा-कांक्षेस शह देण्याचें ठरविलें. अन् मग ती या व्यवसायात शिरली. त्यात ती चांगलीच पुढं आली. आपापल्या क्षेत्रांत शिखर गाठायाची आमच्या दोघात जणूं शर्यतच लागली होती. शेवटी तिने माझा पूर्ण मूड घेतला. मी हरलो.

शाम – अन् मी तुमच्या दोघांच्या महत्वा-कांक्षाना बळी पडलो. (भेसूर हंसतो) सुशिक्षित आईबापांच्या महत्वाकांक्षांना बळी पडलो. (पुन्हां हंसतो)

माया – (व्यथित अंतःकरणानें) शाम, तू आज माझे डोळे उघडलेस. तुझें माझ्यावरील

सर्व आरोप मला मान्य आहेत. पण अजून वेळ गेला नाहीं.

शाम – हं, बैल गेल्यावर झोपा बांधून काय उपयोग! अन् ज्या घरांत माझा सर्व नाश झाला त्यांत राहण्याची मला मुळींच इच्छा नाहीं.

माया – तूं हें घर सोडून जाणार?

शाम – होय अन् तेहि आताच. काय आहे. माझं या घरांत?

सारंग – मोटार, बंगला हे सर्व तुझंच आहे.

शामा – मुळींच नाहीं. माझ्या नि तुमच्या जगांत फार अंतर आहे. तुम्ही सोन्याच्या मंदिरांत राहतां अन् मला या जगांत राहण्यास एक झोपडीदेखील मिळणं फार कठीण आहे. मला जगांत कुणीच विचारत नाही.

सारंग – पण तूं जाणार कुठं? करणार काय?

शाम – भीक मागेन. मजूरी करीन. तुम्हालाच तेवढ्या महत्वाकांक्षा आहेत अन् माझं रक्त काय मेलेलं आहे? मी आपल्या पायावर उभा राहून कांहीं करू शकतो किंवा नाहीं हे मला पहायचं आहे. नाहीं तरी मी इथं जिवंत असून मेल्यासारखाच आहे.

माया – (व्याकूळ होऊन) शाम, तुला कसं सांगू? तुझी आई म्हणून जगण्याची मला किती इच्छा आहे, तुझ्याबद्दल केवढ्या मोठ्या आशा आकांक्षा मनांत बाळगल्या होत्या मी.

शाम – माझ्या आयुष्याप्रमाणें त्यासुद्धां धुळीस मिळाल्या म्हणून समज.

माया – (रडत) शाम, माझ्यावर कधीं असा दुःखाचा हिमालय कोसळेल अशी कल्पनासुद्धां माझ्या मनांत कधीं आली नाहीं काय झालं हे! शाम जगांतून उठणार! नाहीं... नाहीं... नाहीं होऊं देणार मी हें.

सारंग – (रडत) शाम, तूं आम्हाला सोडून गेलास तर आम्ही शाम म्हणून कुणाला हांक मारावी! (माया माडीवर जाते पावलांचा आवाज) नको. तूं जाण्याची कल्पनासुद्धां सहन होत नाहीं मला. तू आहेस म्हणून तर मी आजपर्यंत जिवंत राहिलो. नाहीं तर आहे काय या घरांत. तूं कसाहि असलास तरी माझी म्हातारपणाची कांठी आहेस. आजपर्यंत मी हृदयावर निखारे ठेवून गप्प राहिलो. कारण याला मीसुद्धां थोडा फार कारणीभूत होतो, (माडीवर पिस्तुलाचा आवाज) अरे! हा कशाचा आवाज! आणि हें काय? माया कुठं आहे? तिनं आपल्या जिवाचं कांही बरं वाईट तर करून घेतलं नाहींना! (दोघे माडीवर जातात) माया, हे काय केलंस तूं!

माया – घाबरूं नका. शाम, तू असा माझ्याजवळ ये. आजपर्यंत तू मला एक नटी म्हणून ओळखत आलास. कधीहि 'आई' म्हणून हांक मारली नाहींस ये, आज तूं एका आईचें हृदय पहा. मी आत्महत्या केली नाहीं. माझा एक डोळा फक्त अधू झाला आहे. आतां तुझ्या नि माझ्या जगांतील अंतर कमी झालं.

सारंग – माया, माया त्यासाठीं हे काय केलंस तूं भलतंच!

माया – सारंग, महत्वाकांक्षा एखाद्या व्यसनासारखी असते. माझ्या व्यवसायाचें व्यसनच लागलें होतें. तें सहजासहजी कधींच सुटले नसतें. आतां मला सिनेमाच्या जगांत कुणीसुद्धां विचारणार नाहीं. आतां मी लाखो रु. मिळविणारी नटी राहिली नसून एक साधारण स्त्री आहे. आतां मी माझ्या शामसाठीं वाटेल

त्या खस्ता खाण्यास तयार आहे.शामच्या बाबतींत मी अक्षम्य अपराधी आहे. त्याचें हें प्रायश्चित आहे. शाम मला आई म्हणो वा न म्हणो, मी माझं कर्तव्य करणार.

शाम – (टाहो फोडून) आई! आई, काय केलंस हे माझ्यासाठीं.

माया – (कण्हत पण आनंदाने) शाम, अजून एकदां आई म्हण.

शाम – आई! आई!! फार छळलं तुला मी.

माया – अहाहा! आज मी धन्य झालें माझ्या जन्माचं सार्थक झालं. शाम, येथून पुढें मी तुझं आयुष्य बनवीन ज्या महत्वाकांक्षेनं तुझा सर्वनाश केला तीच महत्वाकांक्षा आतां तुझं कल्याण करील.

शाम – आई! माझी आई!

माया – ज्या अमृतास तूं इतके दिवस पारखा झालेला होतास त्या अमृताचा आतां मी तुझ्यावर सतत वर्षाव करीत राहीन.

('ऑल इंडिया रेडिओ' च्या सौजन्याने)
हैद्राबाद.

---

## रक्ताळले हात

धुंदावली तमिस्त्रा मिणमिणल्या नक्षत्रतारा
मम गेहीं सांकळला नित्याचाच अशीत वारा
तगमगलें अभ्यंतर बधिर बधिर अन् झालें मन
बाई वेडावलें पुरी वेगावतां ग हृत्स्पंदन

भासमान श्वासोच्छ्वास गमला अस्तित्वाचा भार
गळाल्या अन् जाणिवा भावांचे ग ताणतां दोर
लज्जेचिया होमांत विरघळल्या ग नीति श्रुती
धुंदीच्या तणाव्यांत दृगोचिली ग मदन-रीती

दुरावली ममत्वें ग धुसफुसताती कोपऱ्यांत
शब्द संवेदनांची कलेवरें ग अधर दलांत
नेत्रांचिया ग कडांत प्राण गुदमरले लज्जेचे
गात्रेंच राहिली शेष गळतां ग बंध लौकिकाचे

विदीर्णली सहस्रधा निळया अब्रूची ग कांच
वेचावया धावले रक्ताळले परि ग हात.

—वा. आ. देशमुख,
एम्. एस्सी. (उपान्त्य)

# मराठीची मुलुखगिरी

लेखक :—
प्रा. श्रीधर कुलकर्णी
एम्. ए.

मराठ्यांच्या राज्यविस्तारासंबंधीं बरेच संशोधन इतिहाससंशोधकांनीं केलेलें असलें तरी मराठीच्या विस्तारासंबंधींच्या इतिहासाकडे संशोधकांचें लक्ष फारसें गेलें आहे असें म्हणतां येत नाहीं. जें काहीं पुरावे आतांपर्यंत प्रकाशित झाले आहेत त्यावरून जें प्राचीन मराठी वाङमय उपलब्ध झालें आहे त्यापूर्वींहि मराठी भाषा महाराष्ट्राच्या शेजारच्या प्रांतांत विशेषत: आंध्र आणि कर्नाटकांत महत्त्व पावली होती असें सहज सिद्ध होण्यासारखें आहे.

मराठी भाषेच्या उत्पत्तीचा काळ सामान्यत: ७ ते १० च्या शतकांपर्यंत निरनिराळ्या विद्वानांनीं मानलेला असला तरी शके ९०५ मधील श्रवणबेळगोळ येथील गोमतेश्वराच्या मूर्तीवरील शिलालेख हा मराठीचा सर्वांत प्राचीन शिलालेख मानण्यांत येतो. या शिलालेखांत असलेल्या एका मराठी वाक्यानंतर महानुभाव, मुकुंदराज आणि ज्ञानेश्वर यांच्या प्रगल्भ वाङमयीन कृतीच आपल्यासमोर येतात. याचा अर्थ मध्यंतरीच्या काळांत ग्रंथरचना मुळींच झाली नाहीं असा मात्र करतां येणार नाहीं. भाषेच्या बाल्यावस्थेपासून तिची प्रौढ आणि प्रगल्भ अवस्था प्राप्त होईपर्यंत बरेंच वाङमय निर्माण झालें असलें पाहिजे. कोणतीहि भाषा एकाएकी अथवा केवळ उत्पत्तीकाळींच प्रौढावस्था धारण करील हें शक्य नसतें. या अवस्थेंतील वाङमय आपणास उपलब्ध नाहीं एवढाच निष्कर्ष या दोन टप्प्यांवरून आपणास काढावा लागतो.

त्याचप्रमाणें श्रवणबेळगोळ येथील शिलालेख हा मराठीच्या बाल्यावस्थेंतील लेख मानण्याचें कारण नाहीं असें मला वाटते. ज्या जैनांच्या मूर्तीवर हा शिलालेख कोरण्यांत आला आहे त्या जैन संप्रदायाचें महाराष्ट्रीय यात्रेकरू तीर्थयात्रेच्या निमित्तानें त्या भागांत संचार करीत असावेत व त्यांना समजावें म्हणून "श्री चामुंडरायें करविललें" हें वाक्य त्या मूर्तीवर कोरलें गेलें असावें असा अंदाज वस्तुस्थितीस सोडून होईल असें वाटत नाहीं.

सामान्यत: शिलालेख राजभाषेंत, लोकभाषेंत, अथवा शिष्टसंमत भाषेंत कोरलें जातात. म्हैसूर संस्थानांत मराठी लोकभाषा होती असें मानण्यास इतिहासाचा आधार सांपडत नाहीं. त्याकाळांत ती राजभाषा असणें कदाचित शक्य आहे. कारण देवगिरीच्या यादवांनीं कर्नाटकांवर वेळोवेळीं स्वाऱ्या केल्याचे निर्देश प्राचीन इतिहासांत आढळतात. परंतु स्थल काळ आणि परिस्थिति लक्षांत घेतां कर्नाटकांतील जैन संप्रदायांत तरी मराठी भाषा शिष्टमान्य झाली होती असाच निष्कर्ष काढणें सयुक्तिक वाटतें.

याचाच अर्थ शके ९०५ मधील शिलालेख हा मराठी भाषेचा प्रारंभ न मानता कर्नाटकांत मराठी भाषेस प्राप्त झालेल्या शिष्टसंमततेचें तें एक चिन्ह आहे असाच करावा लागतो.

महाराष्ट्राबाहेर मराठीचा विस्तार दहाव्या शतकांत झाला होता हें जसें वरील विवेचनावरून स्पष्ट होते. त्याचप्रमाणें तेराव्या शतकांत कर्नाटकांतील विद्यापीठांत मराठी भाषा शिकविण्याची व्यवस्था करण्यांत आली होती असाहि पुरावा प्रसिद्ध झालेला आहे. शिलालेखांच्या आधारानें म्हैसूर प्रांताचा इतिहास लिहिणाऱ्या राइस या ग्रंथकारानें म्हैसूर प्रांतांतील मालिंगी येथील एक शिलालेख प्रसिद्ध केला असून इ. स. १२९० त इतर दाक्षिणात्य भाषाबरोबरच मराठी भाषाहि शिकविण्याची सोय होयसाल वंशीय राजाच्या प्रधानानें स्थापन केलेल्या विद्यापीठांत करण्यांत आली होती असें या शिलालेखांत नमूद करण्यांत आलें आहे. यावरून ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी लिहिली त्या काळांत परप्रांतांत विद्यापीठांत समाविष्ट होण्याजोगे महत्त्व मराठी भाषेस प्राप्त झालें होतें हें सहज सिद्ध होतें. अर्थात्च मराठी भाषेचा परप्रांतीय विद्यापीठांत झालेला प्रवेश त्या प्रांतांत तिचा कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत प्रसार झाल्याशिवाय राहिला नाहीं हें उघड आहे.

अशा रीतीनें मराठीचें सध्यां उपलब्ध असलेलें प्राचीन अभिजात वाङ्मय ज्या काळांत लिहिले जात होतें त्या काळांत परप्रांतांत या भाषेचा केवळ प्रसार झालेला नव्हतां तर शिष्टमान्यतेचा शिक्का मोर्तबहि तिच्यावर झाला होता हें सहज सिद्ध होण्यासारखें आहे. त्याबरोबरच या निष्कर्षावरून आणखीहि दोन अनुमानें संभवतात. सध्यां जें प्राचीन वाङ्मय उपलब्ध झालें आहे तें बाराव्या शतकाच्या पूर्वीचें नाहीं. इ. स. १२९० म्हणजे शके १२१२ त एका विख्यात विद्यापीठांत मराठी शिकविण्याची सोय करण्यांत आली होती हें लक्षांत घेतां त्यापूर्वीं बरेंच वाङ्मय मराठींत लिहिण्यांत आलें असावें इतकेंच नव्हे तर त्या वाङ्मयाचा परप्रांतावर परिणाम झाला असला पाहिजे हें उघड आहे. हें वाङ्मय मात्र आज आपल्यापुढें नाहीं. दाक्षिणात्य भाषांचें आणि प्राचीन जैन वाङ्मयाचें अधिक संशोधन झाल्यास या अज्ञात वाङ्मयाचें दर्शन घडलें नाहीं तरी त्याचा दुवा सांपडूं शकेल असें मला वाटतें.

वरील विवेचनावरून जें दुसरें अनुमान संभवतें तें हें कीं, हनुमान ज्याप्रमाणें जन्मतःच सूर्यबिंब ग्रासण्याकरितां उड्डाण करता झाला त्याचप्रमाणें मराठी भाषी लोक हे वृत्तीनेच परप्रांतांत संचार करणारे असावेत व परप्रांतांत वसाहती करण्याची परंपरा मराठ्यांच्या दिग्विजयाच्या काळांत सुरूं झाली नसून या वृत्तीचें बाळकडू जन्मतःच मराठी-समाजाला मिळालें आहे असें मानावें लागतें. प्राचीन तेलगू ग्रंथांत या अनुमानास आधारहि सांपडतो. ज्ञानेश्वर काळांत होऊन गेलेल्या पालकुरिकी सोमनाथ या आंध्र कवीच्या 'पंडिताराध्यचरित्र' या ग्रंथांत श्री शैएयाच्या यात्रेस आलेल्या महाराष्ट्रीयांचा उल्लेख करण्यांत आला असून सुमारे २२ ओळींचें एक मराठी गीतहि देण्यांत आलें आहे.

मालिंगीच्या इ. स. १२९० च्या शिलालेखांत मराठी भाषेचा आर्यभाषा म्हणून उल्लेख करण्यांत आला आहे. त्याचप्रमाणें पालकुरिकी सोमनाथाच्या पंडिताराध्यचरित्रांतहि आर्यभाषेचें कवन देतों असा उल्लेख करून मराठी गीत देण्यांत आलें आहे. यावरून तेराव्या शतकांत महाराष्ट्रीय लोकांना आर्यवंशीय मानले जात असावें व त्यांची भाषा ती आर्यभाषा असा तत्कालीन दाक्षिणात्यांचा

समज होता हें दिसून येते. पालकुरिकी सोमनाथ इ. स. १२५० ते १२९९ पर्यंतच्या काळांत होऊन गेला असें मत अलीकडे तेलगू पंडितांत सर्वमान्य होऊं लागलें आहे. यापूर्वीं त्याचा काळ बाराव्या शतकांतील मानण्यांत येत असे. परंतु ज्या वीरशैव पंथीय कानडी कवीच्या उद्गारावरून सोमनाथ बाराव्या शतकांत गणला गेला होता त्या कानडी कवीचाच काल अलीकडचा ठरल्यामुळें अर्थातच सोमनाथास तेराव्या शतकांत गणणें भाग पडलें. परंतु वरंगलच्या काकतीय राजांचा उल्लेख त्याच्या काव्यांतून असल्यामुळें वरंगलच्या शेवटच्या काकतीय राजांच्या पूर्वीं म्हणजे इ. स. १२९५ पूर्वीं तो निश्चित होऊन गेला याविषयींशंका रहात नाहीं.

महाराष्ट्र सारस्वताच्या नव्या आवृत्तीच्या पुरवणींत डॉ. तुळपुळे यांनीं सोमनाथाच्या ग्रंथांत आलेल्या मराठी कवनास "भाषेच्या स्वरूपावरून" चौदाव्या शतकांतील ठरविलें आहे. परंतु सोमनाथांचा काळ कोणत्याहि परिस्थितींत तेराव्या शतकांपलीकडें जाणें अशक्य असल्यामुळें तेराव्या शतकांतील मराठी लोकगीताचा नमूना म्हणून हें गीत आपल्यास उद्बोधक वाटेल.

मूळ गीत तेलगू ग्रंथांत आणि तेलगू लिपींत असल्यामुळें त्यांत बरेच पाठ अपपाठ, पाठभेद आढळून येतात. तथापि, डॉ. ना. गो. नांदापूरकर यांच्या सहाय्यानें त्यांतील योग्य पाठ निवडून तें गीत पुढें देत आहे.

श्री शैल्याच्या यात्रेस निघालेले महाराष्ट्रीय यात्रेकरू कसे गीत गातात अशी प्रस्तावना करून मूळ ग्रंथकारानें "आर्यभाषेचें" कवन पुढें दिलें आहे.

१ मागं राहो नको मज बापु मणत
२ भागवते वाटे भक्त ते मणत.
३ चरलिंग गुरुलिंग शंभुनो मणत
४ पुरवर किती दूर पुरुरव ते मणत
५ अखिल रि कैलास देखशील मणत
६ सुखमुख जालो पुरुरव ते मणत
७ मग महाराटचि महादेव याजि!
८ गगन रणा याजि! कैलास याजि!
९ अखुमराणा याजि सुभदेव याजि!
१० सुखकर अपुलोचि सुभदेव याजि!
११ अरेरे सिवो बग्गुत अप्पुलें लिंग
१२ सिरिगिरी मल्लय्य परम दियन्त
१३ सुखनाल गतिमान लेखिली नाचे
१४ मखर जे सिरिगिरी मल्लय्या राणा
१५ आला निबन्धन ताळगी ताली
१६ माळा समर्पण मल्लय्य राणा
१७ स्तब्ध सन्ताप संसार नाटकने
१८ सर्वज्ञ मल्लय्या सर्वज्ञ गातु
१९ आमच्या मग पुनु हर जान चित्ता
२० आमच्या महाभक्त अखिल संमेल
२१ शरण हे चिद्वर जवळी ते मणत
२२ वर सुख सुखी माझ्या वरद हे मणत

ते भले लोक मला म्हणतात मागें राहूं नकोस (१) भागवत ज्या वाटे गेले ती भक्ति असें ते म्हणतात (२) चरलिंग गुरुलिंग हीं लिंगें महादेवाचींच (३) ते पुरूष म्हणतात ते पुरश्रेष्ठ किती दूर आहे? (४) सारा कैलास पाहिला आहे तो म्हणतो (५) (कैलास पाहून) आम्ही सुखी झालों असे ते म्हणतात (६) मग महाराष्ट्रांतील महादेवा, आकाशलिंगा, कैलासा ये (७-८) अक्षाय्याच्या राजा शुभ देवा! सुखकर आपले शुभदेव येवोत (९।१०) अरे शिवभक्ता! हे आत्मलिंग आहे (११) श्रीगिरि मल्लय्या हा परमतत्त्व देणारा आहे. (१२) श्रीगिरीच्या मल्लय्या राण्याची निरनिराळया तालगीतांनीं, नृत्यानें, माळा समर्पणानें पूजा करीत आहेत. संसार नाटकांत सर्वत्र संताप भरलेला आहे. परंतु ज्ञानी लोक सर्वज्ञ मल्लय्याची. स्तुती करतात. (१३-१८) आमच्या पूर्वी ज्यांनीं

चित्तानें हरीला जाणलें आहे असे लोक होऊन गेले. आमच्या महाभक्ताचा एक मोठा मेळा आहे. ते म्हणतात सर्वांचें आश्रयस्थान जो चिद्वर तो जवळच आहे. तो उत्तम सुख देतो, सुखी लोकांना वर देणारा आहे असे ते म्हणतात. (१९-२२)

याच शतकांतील मराठीच्या परप्रांतांतील विस्ताराचें दुसरें उदाहरण संत नामदेवाच्या चरित्रांत सांपडतें. नामदेवानें ज्ञानेश्वरांच्या समाधीनंतर पंजाबांत कित्येक वर्षें वास्तव्य करून हिंदी भाषेंत पद्यरचना केली. नामदेवांचे कांहीं अभंग शिखांच्या आदि ग्रंथांतहि समाविष्ट करण्यांत आले आहेत. इतका परिणाम नामदेवाच्या वाणीनें पंजाबी जनतेच्या मनावर केला होता. नामदेवाच्या हिंदी पदांची भाषा हिंदी असली तरी कितीतरी मराठी शद्ब व मराठीच्या धर्तीवरचे वाक्यप्रयोग आणि वाक्प्रयोग त्यांच्या पदांत दिसून येतात. त्याचा परिणाम हिंदी वाङ्मयावर मराठीचे ठसे उमटविण्यांत झाला आहे ही गोष्ट अमान्य करतां येणार नाहीं.

मराठीच्या मुलुखगिरीचें चिन्ह अलीकडे उपलब्ध झालेल्या "भण्डीर भाषा व्याकरणांत" हि पहावयास सांपडतें. हा ग्रंथ तेलगू लिपींत पण संस्कृत भाषेंत लिहिलेला उपलब्ध झाला असून सूत्र-भाष्याच्या स्वरूपांत दिसतो. भाष्यकार आंध्र असावा असे दिसते. या ग्रंथांत भण्डीर भाषा म्हणजे गीनांची भाषा, त्या भाषेचें व्याकरण देण्यांत येत आहे असें सांगून अनेक प्राकृत भाषांचा उल्लेख केला असलातरी मुख्यतः ज्या भाषेचें व्याकरण देण्यांत आलें आहे ती भाषा मराठी आहे. (म. सा. पत्रिका १. १)

या ग्रंथाचा काळ मुसलमानांच्या दक्षिणेवरील आक्रमणानंतरचा असावा असें भाष्यांत दिसून येणाऱ्या दोन फारसी शद्बावरून डॉ. वा. गो. परांजपे यांनीं केलें आहे. परंतु व्याकरणाच्या संदर्भांत कोंकणु, नरेंद्रु, तेणे उजळी, आच्चरिजु सारखीं जीं रूपें आलीं आहेत तीं मात्र ज्ञानेश्वरकालीन वाटतात. काळाचा प्रश्न बाजूला सारला तरी मराठी भाषेंत गायिलेलीं गीतें आंध्र देशियांस केवळ आवडलींच नव्हती तर त्या भाषेचें व्याकरण लिहिण्याची आवश्यकता त्यांना वाटली होती एवढें महत्त्व या भाषेनें संपादन केलें होतें हें अनुमान निराधार ठरेल असें वाटत नाही.

नेपाळांतील पशुपतेश्वर आणि रामेश्वराचें विख्यात ज्योतिर्लिंग यांचें मुख्य पुढारीपद मिळविणाऱ्या महाराष्ट्रीयांची मराठी भाषा मराठ्यांच्या राज्यविस्तारापूर्वी परप्रांतांत संचार करीत होती. मराठ्यांची मुलुखगिरी ही मराठी भाषेनें दहाव्या शतकापासून सुरू केलेल्या परंपरेची परिपूर्ती होती असें म्हणणें चुकीचें ठरेल काय?

# प्रीति आणि वैफल्य

लेखकः — पां. बा. गुंजोटीकर एम्. ए. (प्रथम)

यौवन आणि प्रणय हे जसे अगदीं निगडित आहेत तसेच प्रीति आणि वैफल्यहि निगडित आहेत अशी बहुतेकांची समजूत झालेली असतें. प्रेम केलें (तरूण मुलीवर) कीं झाले त्याच्या जीवनांत वैफल्य हें आलेंच अशी पुष्कळांची कल्पना आहे. म्हातारी माणसं तर एकाद्या तरूणाने थोडी बहूत जरी हालचाल केली तरी तो कामांतून गेला असें जाहीर करायला मागेपुढें पहात नाहींत. कारण त्यांची नक्की खात्रीच झालेली असतें कीं एकदा तरूण प्रेम करूं लागला कीं तो कर्तव्यपराङमुख होतो. त्याचं पाऊल वाकडं पडतं नि मग त्याच्या जीवनाचा नाश व्हायला कांहीं अवधि लागत नाहीं. म्हणूनच ते तरूणांच्या हालचालीवर पाळत ठेवीत असतात. म्हातारी माणसंच काय पण पुष्कळ तरूणांचीहि ही समजूत झालेली असतें कीं प्रेम करणें म्हणजे कांही तरी भयंकर आहे. मला एका तरूणानें प्रेमाची व्याख्या केलेली आठवते. "Love is like a cigar which begins from fire and ends in ashes." मला त्याच्या कल्पनेचें फार आश्चर्य वाटलें. प्रेम म्हणजे एक सिगार आहे जिची सुरुवात आगीपासून होतें आणि जिचा अंत राखेंत होतो. त्याचे म्हणणें असें होते कीं कुणी प्रेम करूं लागला कीं त्याचें हृदय तडफडायला लागतें. मन ठिकाण्यावर राहत नाहीं. फार काय हृदयाला आगच लागते आणि मग त्याचा अंत राखेंत होणें क्रमप्राप्तच ठरतें.

प्रेम करणें हें घातुक आहे, या समजुतीप्रमाणेंच खरें प्रेम कधींच सफल होत नाहीं अशीहि पुष्कळांची समजूत असते. 'दो दिलोंको ये दुनिया मिलने नहीं देती' आणि "प्रीत बनी है दुनिया मे मर जाने के लिए" ह्या ओळी त्यांच्या जिभेवर अगदीं नाचत असतात. आपल्या म्हणण्याच्या पुष्टीसाठीं लयला मजनूं आणि रोमियो जुलियेटपासून आजपर्यंतची बरीच उदाहरणें ते सांगत असतात.

मला स्वतःला वरील कल्पनांपैकीं एकहि मान्य नाहीं. माझें असें मत आहे कीं प्रीति ही कर्तव्यतत्पर करणारी आहे. तरूणांत साहस निर्माण करणारी आहे. त्यांच्या पराक्रमाला आव्हान देणारी आहे. एकादा तरूण प्रेम करूं लागला म्हणजे त्याच्या जीवनांत कमालीचा बदल होतो. तरुणीवर प्रेम करण्यानें माणूस कर्तव्यपराङमुख होतो असे नसून उलट कर्तव्यतत्पर झालेला मी पाहिला आहे. आतां एक उदाहरण घेऊनच तुम्हाला सांगतो. माझ्या माहितीचा एक विद्यार्थी इतका उडाणटप्पू होता कीं विचारता सोय नाहीं. त्याचा कार्यक्रम साराच अनियमित. कॉलेजला तो कधीं नियमित गेला असेल तर शपथ! मग अभ्यास करायचं तर दूरच राहिलं. पण चमत्कार असा झाला कीं

त्याचें एका मुलीवर प्रेम बसलें. निदान त्याची तरी अशी कल्पना झाली कीं ती मुलगी त्याच्यावर प्रेम करूं लागली आहे. त्या मुलीसाठीं त्याला काय करावं काय नाहीं असं होऊं लागलं. कांहीं तरी करून त्या मुलीच्या आपण विशेष डोळयांत भरावं असं त्याला वाटूं लागलं. झालं त्याच्या वागण्यांत भयंकर बदल झाला. तो कॉलेजांत नियमित येऊं लागला. अभ्यासांत तत्पर राहूं लागला. आणि नापासांच्या यादींत येणारे त्याचें नांव चांगलें सेकंड क्लासांत झळकूं लागलें.

आमच्या कॉलेजांत एक विद्यार्थी इतका बावळट होता कीं विचारतां सोय नाहीं. त्याच्या शर्टला नेहमींच बटनं नसायची.कधींमधीं असली तरी एखादीच दिसायची. पायजामा सदाच मळलेला नि गोल झालेला. त्याचा तो पोषाख आणि तो अवतार पाहिला म्हणजे अगदीं सभ्य मुलालासुद्धां त्याला बनवण्याचा मोह आवरत नसे. पण काय गंमत सांगावी. त्याची नि एका मुलीची एकदां दृष्टभेट झाली. तिच्या डोळयांत त्याला काय दिसलं कुणास माहीत ? त्याचें मन हुरहुरू लागलें. त्यानें आपल्याकडें आणि आपल्या पोषाखाकडें बारकाईनें पाहण्यास सुरुवात केली. मळक्या पायजाम्याऐवजी अगदीं परीट घडीची पॅंट नि सुंदर रीतीनें शिवलेला शर्ट त्याच्या अंगावर झळकूं लागला. अस्ताव्यस्त विखुरलेलें त्याचे केस आतां अगदीं नीटनेटके राहूं लागले. व त्याच्या बोलण्यांतली सफाई तर नवल वाटण्यासारखी होती. रमणीच्या कटाक्षांत इतकी भयंकर शक्ति असेल याची मला एवढी कल्पना नव्हती !

आमचा गणोबा अगदीं कट्टर काव्यद्वेषी होता. विज्ञानाच्या कूट प्रश्नाचा अभ्यास करण्याची संवय झाल्यामुळें काव्य म्हटलं कीं त्याला कससंच वाटायचं. तो म्हणायचा, काव्य म्हणजे काय शिळोप्याच्या गप्पा, अर्थहीन बडबड, रिकामटेकडया माणसांनीं केलेला उपद्व्याप म्हणजे काव्य, अशी त्याची काव्याची व्याख्या होती. एकदां आम्ही कांहीं मुलंमुली फिरत चाललो होतो. आमचे गणोबा वाटेंत भेटले. त्यांनाहि आम्ही आग्रह करून आमच्याबरोबर घेतलं. गणोबाला काव्याचा विषय आवडत नव्हता म्हणून त्याला खिजविण्यासाठीं आम्ही मुद्दामच तो विषय काढला. मुलींचे चेहरे डोळयांसमोर असल्यामुळें त्याला काव्याविषयीं एकदम तिरस्करणीय असं कांहीं बोलतां येत नव्हतं. त्यामुळं तो आमची चर्चा शांतपणानं ऐकत होता. मुलींना काव्य फार आवडतं हें पाहून त्याच्या मनावर फारच परिणाम झाल्यासारखा दिसला. आम्हां सार्‍यांनांच तो गप्प कसा याचं आश्चर्य वाटत होतं. नंतर मला कळलं कीं तो काव्याचा अभ्यास करूं लागला आहे. मी थक्कच झालो. पुढें पुढें तर त्याला म्हणे स्फूर्तिदेवताहि मिळाली आणि तो कविताहि करूं लागला. खरोखरच त्याच्या कविता इतक्या सुंदर होत्या कीं मराठी काव्यक्षेत्रांत एका नवीन उत्कृष्ट कवीचं आगमन झालं असं कुणीहि म्हटलं असतं.

प्रीतीमुळं घडून आलेले हे फुटकळ पराक्रम जरी सोडले तरी प्रेयसीच्या प्रीतीसाठीं आपल्या पंचप्राणांचें बलिदान दिलेल्या अनेक तरूणांची उदाहरणें आपल्याला सांपडतील. नयनमनोहर रमणींच्या नेत्रकटाक्षांत पुष्कळदां युगपुरूषांच्या संदेशाहूनहि अधिक प्रेरक शक्ति असते आणि त्यांचे मधुर शद्ब कित्येकदां धर्मगुरूंच्या उपदेशाहूनहि अधिक प्रभावी ठरतात. प्रीति जीवनांत दुर्दम्य आशावाद निर्माण करणारी आहे नि जीवनाला सौंदर्य प्रदान करणारी आहे.

लघुकथा

# पुरुषांची जात

लेखक :—**अनंत ढुपरीकर**, बी. कॉम् (प्रथम वर्ष)

मेरी साऱ्या पुरुषजातीवर चिडली होती. तिनें आजन्म अविवाहित राहण्याची प्रतिज्ञा केली होती. हो! जन्मभर अविवाहित! ती आपलें तारुण्य, आपल्या भावना, विकार, विचार सर्व विसरून गेली होती. निष्पाप हास्य करणारे तिचे ओंठ आज सुकून गेले होते. तिचे अल्लड आणि चंचल डोळें आज सुस्त झाले होते. त्यांत कारुण्याची झांक होती. तिचें भिरभिरणारे केस ती एरवीं आपल्या दोन्ही हातांनी आवरत असें. पण आज तिला त्याची शुद्धच नव्हती. ती एकाच गोष्टीचा विचार करीत होती. जॉननें आज आपल्याशीं अशा प्रकारची वर्तणूक कां करावी?

जॉन तिचा बालपणाचा मित्र. तिनें व जॉननें बालपणाच्या कित्येक घटका एकत्र काढल्या होत्या. सदासर्वदा एकत्र बसून ती दोघें शाळेंतील गंमती, शेजारच्या मुलांचा बुळेपणा, इत्यादींचा उहापोह करीत. घरीं कोणी रागें भरलें तर मेरीला जॉनचा मोठा आधार वाटे आणि जेंव्हा जॉनचे वडील ही आपल्याला चांगली सून शोभेल असें म्हणत तेव्हां तिला किती आनंद होत असे. त्यांनी दोघांनी भावी आयुष्याचे किती मनोरम मनोरें बांधले होते. अन् तोच जॉन आज......

माणूस इतक्या खालच्या पातळीवर येत असेल असें तिला वाटलें नव्हते. पण जॉन, तिचा जॉन; तिचा कसला तो. एकदां, तिला वाटलं कीं अस्स जावं जॉनकडें अन् त्याची त्याच्या वडिलांसमोर खूप निंदा करावी. त्याची चांगली कान उघाडणी करावी. नाही नाही ते बोलावं त्याला.

तिला तिची शाळा आठवली. ती दोघे एका बाकावर बसत व एकमेकांशी अशा गप्पा मारीत असत कीं तिला त्यासाठीं कित्येकदां मास्तरांची बोलणीहि खावी लागली होती. पण जॉनचा सहवास सोडणें तिला किती जड जात असे. 'तो, काळ! खरंच आपण तेवढ्यांच राहिलो असतोतर? तिला तशाहि स्थितींत त्या विचाराचें हंसू आले.

तिची सावत्र आई मध्येंच तिच्या खोलीत आली व जेवण तयार असल्याची तिनें सूचना दिली. डोळे पुसणेंच भाग होतें तिला. घास घेताघेताहि तिचा हाच विचार चालू होता. "खरंच, हेंच का माणसाच्या आयुष्याचें सार्थक" किळस आल्या सारखी ती शहारली. तिला विचारांत पाहून तिची सावत्र आई म्हणाली"काय मेरी, अभ्यासाचा विचार चाललाय वाटतं." "अभ्यास" तिनें आपला खालचा ओठ दाबून. घेतला. कसलं कॉलेज अन कसला अभ्यास. डोक्यांत विचारांचें हें थैमान माजले असतांना तिला अभ्यास करणें शक्य तरी होतें का? रोज ती व जॉन दोघे मिळून अभ्यास करीत असत. जॉन अभ्यासांत थोडासा कच्चा असल्यामुळें त्याच्या कशा चुका

होत व आपण त्याला हंसल्यावर तो आपल्या ओठांचें......

तिला वाटलं त्याच्या चुंबनांनीं विटाळलेले ओठ जाळून टाकावेत. तिनें आपल्या ओठांवरची दाताची पकड घट्ट केली व दुःख भरांत तिनें आपली मान हालविली. सावत्र आईच्या वक्षस्थळांवर डोकें ठेवून स्फुंदत स्फुंदत ती म्हणाली, "आई, हे कॉलेज वगैरे सर्व सोडून संतीण व्हावसं वाटतय ग मला." सावत्र आईला तिच्या ह्या बोलण्याचा कांहींच उमज पडला नाहीं. तरी पण तिचें डोकें थोपटीत ती म्हणाली "उगी बाळ, उगी बाळ."

तिच्या सावत्र आईनं तिला रडण्याचे कारण विचारले. तेव्हां ती चांगलीच बुचकळ्यांत पडली. आपल्या सावत्र आईस काय सांगावे हेंच तिला कळेना. जॉननं आपला केलेला अपमान आपण सांगायचा?'

त्याचं असं झालं होतं.

रोजच्या प्रमाणें आजहि ती दोघें फिरावयांस गेली होती. रस्ता तोच, पण जॉन! तिने सतरांदा त्याला न बोलण्याचें कारण विचारले तरीहि त्यानें आपला घुमेपणा सोडला नाहीं. त्याचे मिस्किल डोळें आज क्षितीजाकडे पहात होते; त्याच्या रुंद कपाळावर आंठ्या पडल्या होत्या, चेहरा त्रासिक झाला होता व तो कसला तरी विचार करीत होता. तो बोलावा म्हणून तिने अनेक प्रयत्न केले होते. पण तिच्या एकाहि प्रश्नाला उत्तर मिळालें नव्हतें.

अखेर एका निवांत बाकांवर बसल्यावर त्याच्या गळ्याभोंवती हात अडकवत ती म्हणाली "जॉन, एक सुंदर तरुणी बाजूला बसली असतांना तुला विचार तरी कसा करवतो रे? जरा माझ्याकडें पहा."

क्षण भरच त्याचा चेहरा खुलला पण लगेच गंभीर होत तो म्हणाला "मेरी, तूं माझी होशील?"

तिला त्याच्या प्रश्नाचें आश्चर्य वाटलें. रडकुंडीस येऊन ती म्हणाली "जॉन आज असं काय रे बोलतोस तू. कितींदा आपण एकमेकांना वचनें दिलीत तरीहि माझा असा संशय येतो. सांग ना रे, मी असं काय केलं कि माझ्यावर तुझा असा अविश्वास व्हावा.

"अविश्वासाचा प्रश्न नाही हा मेरी" तो मध्येंच पुटपुटला ती त्याच्या गळ्यावरून हात सोडवत म्हणाली, "मग कसला संशय येतोय तुला. जॉन हें शिक्षण एकदां संपू दे. तुला नोकरी लागल्यावर दुसऱ्याच दिवशीं आपण लग्न करूयात" तो कांहींच बोलत नाहीं असं पाहून ती म्हणाली, "जॉन, आणखी एकदा वचन देऊं का?"

"नुसत्या वचनाना प्रश्न नाहीं हा मेरी, आपलें कॉलेज शिक्षण संपण्यास दोन, जर एखादें वेळीं नापास झालो तर तीन वर्षें लागतील. तोपर्यंत आपण असंच........."

जॉनचं वाक्य अर्धवटच तोडीत ती म्हणाली, "जॉन आपणच नाहीं का ठरवलं कीं स्वावलंबी झाल्याशिवाय लग्न करायचं नाहीं. उगीच तुझ्या डॅडींना मला पोसण्याचा भार."

जॉनने एकदां तिच्याकडें रोखून पाहिले व खालीं पडलेली एक काटकी चघळीत क्षितिजाकडें पाहूं लागला.

थोडा वेळ थांबून तिनेंच बोलण्यांस सुरुवात केली, "तुला तुझ्या डॅडींवर भार देणं योग्य वाटतं?"

तिच्या अज्ञानाची कींव करीत तो म्हणाला, "तुला कसं कळत नाहीं मेरी. एकमेकांपासून दूर राहून सुद्धां आपल्याला एकत्र राहतां येईल."

ओठांचा चंबू करीत तिनें त्याच्याकडें प्रश्नार्थक मुद्रेनें पाहिलें. अन् त्यांवर तिच्या कंबरेभोंवतीं हातांचा विळखा घालून त्यानें त्याच्या वाक्याचें स्पष्टीकरण केलें होतें.

त्याचं तें उत्तर ऐकून मेरी त्याच्यावर खूप चिडली होती. अन् तिनें लग्न न करण्याची व जॉनचें आजन्म तोंड न पहाण्याची प्रतिज्ञा केली होती. तिनें व जॉननें आतापर्यंत एकमेकांना कितीदां तरी वचनें दिली होती. तिनें त्याला चुंबन घेतांना कधीच मनाई केली नव्हती. अन् तिनेंहि त्याच्या कोटावरचें फूल आपल्या ओंठांनी काढले नव्हते का? पण त्याचा फायदा घेऊन जॉन आज.........

तिला आपल्या बालपणची आठवण झाली. तिच्या घरच्या मांजरीला पिल्लें झाली होती व त्यांना तोंडांत घेऊन ती मांजरी एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं चोरासारखी घेऊन जात असे. तिनें एकदां त्याबद्दल तिच्या वडिलांना विचारलें देखील. त्यांवर तिचे वडील म्हणाले, "अग, त्यांचा बाप येऊन खाऊन जाईल अशी भीति वाटतेय तिला." त्यांवर तिनें विचारलें, "पण त्यांचा बाप त्यांना का खातो?" अन् त्यांवर तिच्या वडिलांना नीटसं उत्तर देतां आलें नाहीं. पण ते थट्टेनें म्हणाले, "अग कुमारी माता आहे ही मांजरी."

कुमारी माता! अन् आज जॉन तिला हेंच सुचवत होता.

ती दचकली; संतापली. तिथल्या तिथं जॉनला अगदी तोडून बोलावं असं तिला वाटलं. पण तिनें तसं कांहींच केलं नाहीं. तिनें त्याच्याकडें एकदां तिरस्कारानें पाहिलें व संतापानें ती तडक घरीं निघाली.

अंथरुणावर पडल्यानंतरहि तिला हेच विचार भंडावून सोडीत होते अन् तिचे ह्या कुशीवरून त्या कुशीवर वळणें चालले होते. उद्यां जॉन बहुतेक आपल्याकडें येणार नाहीं; त्याला त्याच्या बोलण्याची खंत वाटली असेल किंवा कदाचित् तो आपल्याकडें येईल व आपली मनधरणी करील तरीहि त्याचे ऐकायचे नाहीं. त्याचा सहवास टाळायचा त्याच्याशी बोलायचे नाही. अन् अशा विचारांतच तिला झोप लागली.

दुसऱ्या दिवशीं ती थोडी उशीराच उठली. घड्याळांत साडेआठ वाजले होते. कॉलेजला अर्ध्या तासाचा अवधीं होता. तिची सावत्र आई कामावर गेली होती. चला आजपासून अभ्यास, अभ्यास आणि अभ्यास. जॉनच्या वाऱ्यालाहि उभें राहायचें नाहीं. असें म्हणत तिनें एक जांभई दिली; थरमॉसमधील चहा घेतला अन् केशभूषा करण्यांसाठीं ती आरशासमोर बसली. तिनें हळुवार हातांनीं आपले केंस विंचरले. अन् लिपस्टिक उचलली. पण ती तशीच तिच्या हातांत राहिली.

जॉन नेहमीसारखा हंसत तिच्या खोलींत आला. त्यानें पाठी मागून तिचे दंड धरले व व तिला जवळ ओढली. तिनें वळून त्याच्याकडें पाहण्याचा प्रयत्न केला पण त्याच्या डोळयात कारुण्य भरलें होतें. त्यानें तिला आपल्या बाहुपाशांत घेतले होते व तो भराभर तिची चुंबनें घेत होता.

ती बावरली, थरारली; एका क्षणांत पुरूष जातीवरचा राग, जॉनवरचा राग, ती मांजरी, ते संतीण होण्याचे विचार, आजन्म अविवाहित रहाण्याचा निश्चय, नवाचे ठोके देणारे तें घड्याळ, कॉलेज सर्व कांहीं ती विसरली. तिची सारी प्रतिकार शक्ति लुळी पडली, व जॉनच्या गळयांत पडून ती सुस्तावलेल्या आवाजात म्हणाली, "जॉन, कालच्या माझ्या वागणुकीवर रागावलांस का? मला क्षमा कर जॉन. मी यापुढें तुझ्या मनाविरुद्ध कधींहि वागणार नाहीं."

—★—




लेखक :—
ग. रा. दंडे बी. ए. (प्रथम)

"वाङ्मय व कला ही बहुजन समाजाची आहे. जनतेचा त्यांजवर हक्क आहे" असे लेनिननें म्हटले आहे. जीवनाच्या प्रतिकूल परिस्थितीशीं झगडणाऱ्या बहुजन समाजाची व्यथित अंतःकरणें उल्हसित करून त्यांची भावना, कल्पना व विचारशक्ति यांना उदात्त करणारें वाङमय निर्माण झालें पाहिजे. जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलला पाहिजे. सामाजिक जीवनाविषयीं साहित्यांत आस्था दिसायला पाहिजे. आपलें प्राप्त जीवन ही शिक्षा किंवा अधःपात नसून ती एक भाग्याची गोष्ट आहे; त्याविषयीं आपण मुद्दाम जिव्हाळा बाळगला पाहिजे. यांत्रिक युगामुळें सर्वसाधारण मनुष्याच्या जीवनांत आज वैफल्य माजलें आहे; मानवी जीवनांतील विषमता, कृत्रिमता व स्वार्थीपणा पाहून मन वैतागून जातें; दारिद्र्य, महागाई, काळाबाजार इत्यादि राक्षसांच्या छळानें जनता त्रस्त झालेली आहे; असें जरी असलें तरी केवळ निराशेची, वैफल्याची रडगाणीं गाणारें वाङमय समाजापुढील प्रश्न सोडवूं शकणार नाहीं. जीवनांतील दुःखांशीं झगडा करावयास लागणारा मंगलमय आशावाद साहित्यांत असावा लागतो. जीवन कलहानें गांजलेल्या माणसाच्या मनांत चैतन्य उत्पन्न करून, त्याला समाधान प्राप्त करून देऊन अधिक कार्यप्रवण करावयास लावणें हें वाङमयाचें कार्य आहे. सर्वसाधारण माणसाला आपल्या रोजच्या जीवनक्रमांत जर कांहीं साहय व प्रोत्साहन मिळालें तरच साहित्याचें सार्थक होईल. आपल्या जीवनांतील रुक्षता, उद्विग्नता, नैराश्य ज्यायोगें नाहींसें होईल अशा ललितकृति आज मराठींत हव्या आहेत.

समाज कोणत्या रोगांनीं पछाडला आहे त्याचें नेमक निदान करणें व या दोषांपासून मुक्त होण्यासाठीं शक्य असल्यास सूचना मांडणें हें साहित्यिकाचें काम आहे. समाजांतील दोष सांगतांना त्याला विरोध पत्करावा लागेल, अपमान सहन करावा लागेल, संपत्ती प्राप्त न झाल्यामुळें निकृष्ठ अवस्थेंत जीवन कंठावें लागेल पण साहित्यिकानें आपलें कर्तव्य पार पाडलेंच पाहिजे. समाजानें औषधाच्या रूपानें या गोष्टी स्वीकाराव्या लागतात.

फडके म्हणतात त्याप्रमाणें कला ही आनंदासाठींच निर्माण होत गेली व ह्या अनुषंगानें निर्माण होणारें साहित्य कल्पनेच्या रूक्षभूमींत विहार करीत राहिलें तर मनोरंजनाशिवाय अशा साहित्याला कांहीं जास्त महत्व देतां येणार नाहीं. समाजाची इमारत जीर्ण झाल्यामुळें ढांसळून पडत आहे, सर्व लोकांत पसरलेल्या नैराश्यामुळें व रुक्षतेमुळें या मंदिराचे बुरूज कोसळत आहेत, सार्वत्रिक अश्रद्धेमुळें कुणाचा आज कशावरच विश्वास राहिला नाहीं, धर्माची व नीतीची शिकवण नष्ट होत चालल्यामुळें सगळीकडें विचारांचा गोंधळ माजला आहे. अशा प्रसंगीं समाजाची नव्यानें रचना करावयास लागणारी प्रेरणा साहित्यानें दिली

पाहिजे. भारतांत आम्हाला एक नवी संस्कृति निर्माण करावयाची आहे.सर्व जातींच्या लोकांची, सर्व धर्मांच्या लोकांची. आपण सागराला पवित्र कां मानतो? त्यांत अनेक पवित्र नद्यांचा संगम झालेला असतो म्हणून. भारतालाहि सारें जग असेंच पवित्र मानत आलें आहे. या देशांत अनेक धर्मगंगाचा सुंदर संगम झाला आहे. भारताचा उज्वल इतिहास सन्मुख ठेऊन आपल्याला पुन्हां तोच विश्व बंधुत्वाचा, "हें विश्वचि माझें घर" किंवा "एकमेकां साह्य करूं अवघे धरूं सुपंथ" चा प्रेमाचा, शांतीचा संदेश जगाला द्यावयाचा आहे, सूर्याप्रमाणें भारताला जगावर तळपायचें आहे. तेव्हां हें कर्तव्य पार पाडण्यासाठीं साहित्यानें पुढें सरसावले पाहिजे.

राजकीय स्वातंत्र्य मिळालें म्हणून काय झालें? खरें सामाजिक स्वातंत्र्य प्राप्त व्हावयाचें आहे. सामाजिक जीवनाची पुनर्घटना करण्याचें कार्य आज पुढारलेल्या देशांत साहित्याद्वारें केलें जात आहे. वाङमय हें केवळ मनोरंजनाचें किंवा विश्रांतीच्या वेळीं मनोविनोदनाचें साधन नसून आचार्य अत्र्यांच्या शद्बांत सांगावयाचें म्हणजे, 'वाङमय हें सामाजिक पुनर्घटनेचें प्रभावी शस्त्र आहे.' वाङमयानें समाजाचें जीवन घडवितां येते, समाजांतील जुन्या दुष्ट चालीरीति बदलतां येतात, समाजाला मानवतेच्या विशाल प्रांगणांत आणतां येते, म्हणून माझेंतरी असें मत आहे कीं वाङमय सेवक हा समाजसेवक असलाच पाहिजे. जीवनासंबंधी प्रेम उत्पन्न करणें हेंच वाङमयाचें कार्य आहे. जीवननिष्ठा टिकविणें व सर्वत्र प्रेमाचें राज्य पसरविणें हेंच प्राचीन कालापासून गांधीजीपर्यंतच्या तत्त्वज्ञानाचें सार सांगता येईल.राजकीय स्वातंत्र्य प्राप्त करून देणें याला गांधीजींच्या तत्वज्ञानांत दुय्यम स्थान आहे. टॉलस्टाय थोर कलावंत होता पण तो सुद्धा म्हणतो कीं साहित्यानें नीतीची, समाजाची पर्यायानें जीवनाची बंधनें ही पाळलीच पाहिजेत. कला ही अवदसा आहे, तिला मोकाट सोडूं नका असें तो म्हणतो. केवळ अनीतीचें समर्थन करणाऱ्या वाङमयाचा "कलेसाठीं कला" असें म्हणणारे लोक सुद्धां तिरस्कार करतील. अनेक कथा कादंबऱ्यांतून आज स्वैराचाराचा पुरस्कार केला जात आहे. समाजहिताच्या दृष्टीनें साहित्यांतील असे प्रकार आज थांबविणें अपरिहार्य झाले आहे. प्रीति-प्रणय ही उच्च भावना आहे असे आम्ही मानतो पण तिच्या पूर्ततेंत निव्वळ शारीरिक आनंद उपभोगण्याची भावना दाखविणें उचित नाहीं. 'कलेसाठीं कला' या तत्वाचे पुरस्कर्ते त्यांच्या कलेमुळे हीन निकृष्ठ भावना व विचार यांचा प्रसार कसा होत आहे तिकडें जाणुन बुजून दुर्लक्ष करीत आहेत.साहित्य हें समाजजीवनाच्या विकासासाठीं, उन्नतीसाठीं व साफल्यासाठीं लिहिलें गेले पाहिजे. आजची मानवी संस्कृति बाजारी बनत चालली आहे. नवी संस्कृती निर्माण करणें साहित्यिकांचें काम आहे. तेव्हां साहित्य हे ध्येयवादी असलें पाहिजे. निर्दोष समाजरचना कशी करावी हें ध्येय समोर ठेवून काम झालें पाहिजे. आजच्या समाजाचें केवळ यथार्थ चित्र रेखाटणाऱ्याच नव्हे तर त्या आदर्श समाजाकडें नेणाऱ्या साहित्यिकांची आज आवश्यकता. कारण Authors are the unrecognized legislators of the world. "समाजजीवनाचे शिल्पकार" अशा शद्बांत शैलीनें साहित्यिकांचा गौरव केला आहे. वाङमय सेवकावर इतकी मोठी जबाबदारी आहे.

आज मराठींत "वास्तवता" या गोंडस नांवाखालीं कांहीं लेखकांनीं समाजाच्या वस्तुस्थितीशीं असत्य वर्णनें दडपून आपल्या हीन प्रवृत्तींना वाव देण्याचा धुडगूस चालविला आहे. आर्थिक विवंचनेनें व सामाजिक विषमतेनें गोंध--

ळून अगतिक झालेला आजचा मनुष्य हा विलास लोलुप बनला आहे असा आभास हे "नवकवि व लेखक" उत्पन्न करीत आहेत. हा वास्तववादाचा खून आहे. समाजांत एखादी अनैतिक गोष्ट घडली म्हणून तिला सार्वत्रिक स्वरूप देण्यांत आमच्या या लेखक महाशयांना काय पुरुषार्थ वाटतो कुणास ठाऊक? विवाहित स्त्रीपुरुषांनीं इतराकडें अभिलाषेनें पहाणें हा तर लघुकथांचा विषयच होऊन बसला आहे. कित्येक कथांत लग्नाअगोदरच नायिका नायकाबरोबर 'सहवास' करूं लागते, मोलकरणीशीं संबंध ठेवणाऱ्या वीरांची चित्रें रेखाटण्यांत कांहीं बहाद्दर गुंग झाले आहेत तर लहानाचा मोठा केलेल्या एका अनाथ विद्यार्थ्याकडून आपली 'इच्छा' तृप्त करून घेणाऱ्या धनिक बाईची मनस्थिति वर्णन करण्यांत कांहीं जणांनीं लेखणी वाहिली आहे. असे प्रकार अपवादात्मक समाजांत घडतात· लाखांत एकजण अनैतिक वृत्तीनें वागला म्हणून "समाज हा असा झाला आहे" असे दाखविण्यांत या लेखकांनीं भलतीच मोठी चूक केली आहे. अशा प्रकारचे स्वैराचार समाजांत घडत असले तरी त्यांवर प्रकाश टाकून असल्या अनिष्ट गोष्टींना पायबंद घालण्याचा प्रयत्न करणें उचित कीं स्वैराचाराची गोडवी गाणें उचित? कारवार संमेलनाध्यक्ष श्री. अ. का. प्रियोळकरांनीं म्हटल्याप्रमाणें असल्या प्रकारचें हें "फाल्गुन वाङमय" नष्ट झालेंच पाहिजे तरच मराठी भाषेची अभिवृद्धि होईल. थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास समाजसेवेचें व्रत प्रत्येक साहित्यिकानें घेण्याची वेळ आज आली आहे समाजाची नैतिक अधोगति होत असतांना व सांस्कृतिक ऱ्हास होत असतांना आमचे साहित्यिक आतां किती दिवस "ममजिवाची प्रियकरणी" करीत रहाणार?

ही झाली "नव्या" लेखकांची गोष्ट. समाजांत खळबळ माजली असतांना सुद्धां चंडोलाप्रमाणें अहर्निश अंतराळात हेलकावे खात रहाणारे, "कलेसाठीं कला" असें अट्टाहासानें म्हणणारेहि आहेत. त्यांना वाटतें आपल्या नाजुक हातानें रंगाऱ्याचें कारखाने उभे रहातील, नुसती टाळी वाजविली कीं मयसभा निर्माण होईल. असें मनोरंजनासाठीं लिहिलेलें वाङमय 'अक्षर वाङमय' नव्हे. समाज जीवनांशीं कांहीं संबंध नाहीं असे म्हणणारे काश्मीर ला जाऊन हैद्राबादेस येऊन तेथील परिस्थितीवर कादंबऱ्या लिहिण्याचा प्रयत्न कां करतात? त्याचा तो प्रयत्न कितपत साधला आहे हा प्रश्न निराळा. पण जीवनाशीं संबंध असावा लागतो हे त्यांना देखील मान्य करावे लागते. कितीहि झाले तरी कलावंत हा मनुष्यच असतो. प्रत्यक्ष वस्तुस्थितीशी त्याचा विरोध असणें शक्य नाहीं. या सत्य सृष्टींतील मनुष्याचे समाज जे रीतिरिवाज मानीत असतील, जे व्यापार व्यवहार करीत असतील, ज्या भावना आणि ज्या कल्पना बाळगीत असतील, त्याच्याच अनुषंगानें कलावंतांचें अवलोकन चालूं असतें. त्या समाजांतील रीतिरिवाज त्याच्या सौंदर्यशोधक बुद्धीला ओंगळ वाटतील तर त्यांचे तो खंडन करील. जे नीतिनियम त्याला बदलावेसे वाटतील त्यांत तो फेरफार सुचवील एनकेनप्रकारेण समाजाला सर्वांग सुंदर बनविण्याची खटपट कलावंत करीत असतो. सामाजिक सुधारणेच्या प्रचाराचें कार्य करीत असतांना हरीभाऊ आपट्यांना समाजांत कित्येक सौंदर्य विघातक गोष्टी दिसल्या. धर्माच्या नांवाखालीं व रूढीच्या धाकामुळें समाजांत जे अनिष्ट प्रकार माजून राहिले होते त्याचें यथायोग्य स्वरूप त्यांनी आपल्या वाङमयाद्वारें स्पष्ट केलें. विवेकानंद, रविन्द्रनाथ टागोर, अरविंद घोष इत्यादि धर्माच्या, वाङमयाच्या व तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत होऊन गेलेल्या थोर महा पुरुषांनीं समाजाचें नेतृत्व स्वीकारले होते. ज्यावेळीं संकृत वाङमयाचा बडींवार माजला होता. सर्व धर्मग्रंथ उच्च वर्णासाठीं राखून ठेवण्यांत आले होते व सर्वसाधारण लोकांची उपेक्षा केली जात होती त्यावेळीं ज्ञानदेवांनीं नाहीं का समाजाचें नेतृत्व स्वीकारले? थोडक्यांत सांगावयाचे झाल्यास कला आणि वाङमय फक्त जीवनासाठींच नाहीं तर सेवेसाठीं आहे म्हणूनच सेवेसाठीं कला (Art for services sake) चा पुरस्कार आज अधिकाधिक व्हायला हवा.



—०★०—




लेखक :—**पद्माकर डावरे** एम्. एस्सी. (प्राणिशास्त्र)

'ज्योत्स्ना' मासिकाच्या संपादकांकडून आलेलं पत्र मी पुन्हां एकदां वाचलं. "ज्योत्स्नेच्या लघुकथा विशेषांकासाठीं आपण कृपा करून एखादी उत्तमपैकीं लघुकथा **शक्य तितक्यां लवकर** लिहून पाठवावी अशी विनंति आहे."

पत्राची घडी करून मी ती पाकिटांत ठेऊन दिली आणि इझिचेअरवर अंग टाकून देऊन नव्या कथेच्या कथानकाविषयीं विचार करूं लागलो. बरेंच दिवसपर्यंत मनांत घोळत असलेल्या कांही प्रसंगाची मी मनाशीं जुळवाजुळव केली – पण कथेला सुरवात कशी करावी हें माझ्या लक्षांत येईना.

थोड्या वेळानंतर चटकन् माझ्या डोक्यांत एक कल्पना आली "बस्स, असंच करावं. नायकान त्याच्या प्रेयसीला लिहिलेल्या पत्रानंच कथेला सुरवात करावी!" "उत्तम कल्पना!" मी स्वतःशी उद्‌गारलो.

वहींतला एक कोरा कागद फाडून घेऊन मी पेननं त्यावर लिहिण्यास सुरवात केली —

"माझ्या जिवलग उषेस –

काय लिहूं? आशिर्वाद कीं नमस्कार? छेः पण दोन्हीहि नकोत. इतकं औपचारिकपणानं लिहायला आपली मैत्री कांहीं एक दोन दिवसाचीच नाहीं. पण तसं पाहिलं तर तुझी माझी ओळख झाल्याला पुरतें पंधरा दिवसदेखील झाले नाहींत. खरंच, या पंधरा दिवसांत आपण एकमेकांच्या किती जवळ आलो नाहीं? जणूं तुझे अन् माझे पूर्वजन्मीचेच कांहीं ऋणानुबंध होते. मी स्पष्टपणें कबूल करतो. मला तुझ्याविषयीं आकर्षण वाटत. तुझ्याशीं बोलण्यांत, तुझ्याबरोबर फिरण्यांत, तुझ्या सहवासांत मला कल्पनातीत सुख मिळतं आणि माझी खात्री आहे तुलाहि तसंच वाटत असलं पाहिजे! तांत्रिक भाषेंत यालाच 'प्रेम' म्हणतात. मी त्याला कांहींच म्हणूं शकत नाहीं. कारण मला जें तुझ्याविषयीं वाटतं त्याचं वर्णन शब्दांनीं करतां येणं शक्य नाहीं. उषा, मग एक विचारूं का? माझ्या आयुष्यांत माझी अर्धांगी या नात्यानं तूं प्रवेश करू शकशील? स्पष्ट विचारलं म्हणून क्षमा कर, पण हें केव्हां ना केव्हां तरी विचारणं आवश्यक होतं. होय ना?

तुझ्या कालच्या पत्रांत तूं व्यक्त केलेली भीति अगदींच व्यर्थ आणि निराधार आहे. तूं लिहिलंस कीं "मला असं कळलय, कीं तुमचं एका मुलीवर प्रेम आहे आणि तुम्ही नेहमीं तिच्याकडे जात असता." हो अगदीं खरं आहे तें!

मी रोज तिच्याकडें जात असतो, कारण ती माझी मामेबहीण आहे आणि माझं तिच्यावर अतिशय प्रेम आहे; पण तें भगिनी-प्रेम! समजलं ना आतां तरी?

उषा, अजूनहि माझ्याविषयीं तुझ्या मनांत शंकाच आहे कां ग? असूं दे, आज संध्याकाळीं हिलवर फिरायला जाऊं या – त्यावेळीं मी तुझे सारे गैरसमज दूर करीन. मग तर झालं?

अरे हो बरी आठवण झाली, तुला एक महत्वाची गोष्ट सांगायची आहे. काल मी तुला जीं गुलाबाचीं फुलं पाठवली होतीं ना!......"

\+ + + +

अन् एवढ्यांत घड्याळाचा एक ठोका पडला. मी दचकून घड्याळाकडं पाहिलं! 'बापरे साडेदहा? इकॉनॉमिक्सचं लेक्चर बुडणार कीं काय आज?' असं मनाशीं म्हणून मी चटकन् उठलो. लेखासाठीं घेतलेल्या कागदांची आवराआवर करण्याच्या भानगडींत न पडतां टॉवेल घेऊन मी बाथरूमकडे धांवत गेलो.

स्नान करतांना माझ्या मनांत आलं – आज लेक्चर्स संपली कीं परस्पर रश्मीकडं जायचं. तिची मावशी चारलाच घराबाहेर पडते. आपण कमीतकमी साडेचार वाजेपर्यंत तरी गेलं पाहिजे. जर कां उशीर झाला तर रश्मी अशी भडकेल कीं विचारतां सोय नाहीं. विचाराच्या भरांत घाईघाईनं स्नान आटोपून मी परत खोलींत आलो.

कपडे करतांना माझी सहज टेबलाकडं नजर गेली. मला थोडंसं आश्चर्य वाटलं, कारण टेबलावरचीं पुस्तकं विस्कटल्यासारखीं दिसत होतीं. 'आपल्या पश्चात् कुणी खोलींत तर येऊन गेलं नाहीं'! माझ्या मनांत विचार आला मला निष्कारण अस्वस्थ वाटूं लागलं! पण लगेंच वाटलं कीं शेजारच्या बोकीलांचा पम्या येऊन गेला असेल.

मनाच्या अवस्थेकडे दुर्लक्ष करून मी झटपट कपडे केले अन् बाहेर पडलो.

सायंकाळीं चारच्या ठोक्याला आमचं शेवटचं लेक्चर संपलं आणि 'गुर्जर कॉलनी' ला जाणारी बस गांठली.

बस कॉलनीसमोर थांबली त्यावेळेस साडेचार वाजायला आले होते. कॉलनीला वळसा घालून मी रश्मीच्या बंगल्याकडे जाण्यास निघालो. बंगल्याजवळ येताच मी वर पाहिलं. वरच्या मजल्यावरच्या तिच्या खोलीची खिडकी उघडीच होती. मला हायसं वाटलं! फाटकांतून आंत शिरल्याबरोबर उजव्या हाताचा जिना चढून मी वर गेलो अन् दाराच्या बाजूला असलेल्या कॉलबेलच्या बटणावर हात ठेवला. आंतल्या खोलींत कर्कशपणानं घंटा वाजल्याचा आवाज स्पष्टपणानं माझ्या कानावर आला. मी क्षणभर थांबलो. मला वाटलं नेहमीप्रमाणं 'आले हं' हे रश्मीचे लाडिक आवाजांत उच्चारलेले शब्द ऐकूं येतील अन् चटकन् येऊन ती दार उघडील. दार उघडतांच खोट्या रागाचं सोंग घेऊन ती लगेंच आंत जाऊं लागेल. तिचे दंड पकडून आपण म्हणूं "सरकार! उशीराबद्दल क्षमा असावी. सेवकाचा नाइलाज झाला हुजूर!"

आपले दंड रागानं सोडवून घेऊन ती म्हणेल "पुरे झालं तें हुजूर अन् मजूर! रोजचाच उशीर ठरलेला आहे तुमचा! एखाद्याचा जीव टांगणीला लावण्यांत काय मजा वाटते कुणास ठाऊक?"

"अग पण वेडे – मी लवकर येऊं तरी कसं? मी आलो अन् तुझी ती मावशीबाई घरी आली म्हणजे? चांगलीच शोभा व्हायची आमची!"

"कांहीं सांगूं नका हं!" रागानं खांदे उडवीत ती म्हणेल "मावशी राममंदिरांत जाण्यासाठीं बरोब्बर चारच्या ठोक्याला बाहेर

पडते आणि ती सहा वाजल्याखेरीज कधीं चुकून परत येत नाहीं हें जसं कांहीं माहीतच नाहीं तुम्हाला!''

तिच्या हनुवटीखालीं हात घालून तिचा चेहरा आपण वर करूं अन् कपाळावर ओठ टेकून म्हणूं "बायका रागावल्या म्हणजे त्यांचं कपाळ इतकं गरम होत असतं हे आपल्याला नव्हतं बुवा माहीत!"

"होय कां बुवा?" क्षणभर आपला राग विसरून ती म्हणेल, "मग 'बुवांना' काय काय माहिती आहे तें तरी कळूं द्या!"

आपण तिचे दंड गच्च पकडून म्हणूं "बुवांना एकच माहीत आहे! ते म्हणजे कपाळा-खालीं नाक असतं अन् त्याखालीं ओठ असतात!" आणि —

— पण रश्मीची चाहूल मला ऐकूं आली नाहीं. मी पुन्हां एकदां बटनवर हात ठेवला. पुन्हा बेल वाजली पण आंतून कुणाचाच आवाज आला नाहीं. "अरेच्या!" आश्चर्यानं मी म्हणालों अन् दाराला धक्का दिला – त्यासरशीं तें एकदम उघडलं गेलं. माझीं नजर समोरच असलेल्या पलंगाकडे गेली. रश्मी पलंगावर बसली होती. तिच्याकडें पहाताच मला आश्च-र्याचा झटकाच बसला. माझ्या अंगावर सरसरून कांटा उभा राहिला! – तिचा चेहरा प्रेतासारखा पांढराफटक पडला होता, डोळे तारवटले होते, केस विसकटले होते अन् साऱ्या शरीरावर एक प्रकारची भेसूर कळा पसरली होती. मी एकदम घाबरून म्हणालो "रश्मी—" अन् झटकन् माझी नजर कॉटजवळच्या टेबलाकडें गेली. टेबलावर 'पॉयझन्'चं तांबडं लेबल असलेली बाटली उघडी पडली होती. भीतीनं मी किंचा-ळलो "रश्मी! हें काय केलंस तूं?"

माझ्या डोळ्यासमोर भयाण काळोख पसरला. काय होतं आहे, याचा मला उमजच पडेना. कितीतरी वेळ मी जमीनीला खिळल्या-सारखा उभा राहिलो असेन! रश्मीनं अस्पष्ट आवाजांत हांक मारली "जयंत!" त्यासरशीं मी चटकन् भानावर आलो. माझी गारठलेली विचारशक्ति एकदम जागी झाली अन् कांहीं एक विचार न करतां मी जिन्यावरून धांवत खालीं गेलो. कोपऱ्यावरच्या टॅक्सी स्टॅण्डला जायला मला अर्धा मिनिटहि लागला नसेल. एका टॅक्सीच्या उघड्या दारांतून आंत उडी टाकीत मी म्हणालो "चलो जल्दी! गुर्जर-कॉलनी!"

टॅक्सी बंगल्यासमोर येऊन उभी राहिली. मी झपाट्यानं जिना चढून वर गेलो अन् पलं-गावरनं रश्मीला उचललं. तिला उचलतांना माझी नजर पुन्हां एकदां त्या बाटलीकडें गेली. त्या बाटलीखालीं एक पत्र दिसत होतं. तें पत्र अन् बाटली मी खिशांत घातली आणि रश्मीला उचलून घेऊन खालीं आलो तिला टॅक्सींत ठेवतां ठेवतांच मी ड्रायव्हरला म्हणालो "ससून हॉस्पिटल – ताबडतोब – एक सेकंदहि गमावूं नकोस!"

ड्रायव्हरनं भरधांव टॅक्सी सोडली!

वेगदर्शक कांटा पन्नासाच्या दिशेनं सरकत होता – तरी पण मला तो वेग कमीच वाटला. माझ्या छातीचे ठोके त्यापेक्षांहि अधिक वेगानं पडत होते.

मी रश्मीकडे पाहिलं. तिनें डोळे आतां पूर्णपणें मिटून घेतले होते. बेशुद्धावस्थेंत असावी ती! तिचा चेहरा निळसर पडत चालला होता. माझ्या सर्वांगावर तरारून कांटा आला. तिच्या-कडें पहाण्याची माझी छाती होईना. माझ्या हातापायाच्या तळव्यांना दरदरून घाम सुटला. खिशांतून बाटली काढून मीं पाहिलं तिच्यावरचीं पॉयझन ही तांबडीं अक्षरं माझे डोळे फाडफा-डून पहात होती. क्षणार्धात त्या अक्षरांचें सह-

# रानच्या पांखरा

कवि - डॉ. नारायणराव नांदापूरकर

माझ्या रानच्या पांखरा । नको जाऊं दूरदेशी
घरच्या घरी राहूनीया । झाल्यें मीरे परदेशी
ताड माड उंचीवरी । हिरवीरे तुझी माडी
तेथूनी तू पाहतोसी । नवलाख वतनवाडी
मन-भुलावनीचा तू । तुझा नवतीचा ठसा
मन-धरनी करीते । फिराया ये राजहसा
किती गगनी भराऱ्या । आतां घेशीलरे तरी
खिनभरी इसाव्याला । याव माझ्यारे मंदीरी
सख्या रानच्या पांखरा । किती फिरविशी माना
तुझ्या वांचून मजला । घडीभरी करमना
गगनीच्या देवांगना । तुझा पाहून ठसका
उतरती धरनीला । लोभ लावाया लटका
सख्या रानच्या पांखरा । दीठ तुझीरे चंचळ
ऊर माझा धडधडे । नाही ठरत अंचळ
तुझ रानच्या पांखरा । कसं मजळ बोलन
बानमारला कसून । बसे हुर्दात घुसून
माळचानं लाविली मोट । पानी दांडानं चाल्लं
तुझ्या वांचुन पांखरा । रान झुरनी लागल
माळियानं शिपूनीया । मळा केला हिरवागार
नाही किलबिल तुझी । मनी उदास शिवार
येरे सुखाच्या सोयऱ्या । माझ्या रानच्या पांखरा
पिर्थिमीच्या पाठीवरी । मला तुझाच आसरा
हिरवा मांडव जाईचा । घांस घाली न साईचा
पाड अंबूसरे गोड । देनं आंब्याच्या राईचा
आना माझ्या अंगनांत । सांडल्यारे सोन साळी
सख्या रानच्या पांखरा । चरायारे येरवाळी
सख्या रानच्या पांखरा । किती येऊं काकुळती
देवाजीन रे घडली । आपली दोघांची संगती
सख्या रानच्या पांखरा । वस्त-ठायींच साजती
किती सांगू जिवलगा । चांफ्या शेजारी शेवंती.

(पान २८ वरून चालू)

सावधी तुकडे होऊन माझ्या डोळयासमोर वेडे वाकडे फिरूं लागले. डोळ्यापुढें पुन्हां एकदा अंधारी आली! ब्रेकच्या कर्कश्श आवाजानं मी शुद्धीवर आलो. पांचाची नोट काढून मी टक्सीवाल्याच्या अंगावर फेकली आणि डॉक्टराच्या रूमकडे धांवत गेलो. सुदैवानं माझ्या ओळखीचे डॉक्टर देसाई रूममध्येच होते. त्याना पहातांच मला काय बोलावं हें समजेना "डॉक्टर! - रश्मी-पॉयझन - टॅक्सीत आहे ती - प्लीज जलदी करा - फॉर माय सेक डॉक्टर!" एवढेच शब्द माझ्या तोंडून बाहेर पडले.

खिशांतून बाटली काढून मी त्यांच्या हातांत दिली अन् अंगातलं सारं त्राण नाहीसं झाल्या-सारखं होऊन मी तिथल्या खुर्चीवर अंग टाकून दिलं.

मेंदूला एक प्रकारची विलक्षण ग्लानी आली होती. त्याच्या साऱ्या संवेदना नाहीशा झाल्या होत्या डोळे उघडे असूनहि दिसत नव्हते व कान सुरक्षित असूनहि ऐकूं येत नव्हते.

हॉस्पिटलच्या वॉर्डबॉयजनी रश्मीला माझ्या समोरून स्ट्रेचरवरनं नेलं. पण मला उठावंसं वाटेना. माझ्या पायांत तेवढी शक्ति राहिली नव्हती. नाहींतरी मी तिच्या मागोमाग जाऊन काय करणार होतो? कदाचित पोटांत गेलेल्या विषानं यावेळेपर्यंत तिच्या काळजाचा ठाव घेतला असेल आतां जाऊन काय उपयोग होता? रश्मीचा मृत्यू! माझ्या मनाला हे खरंच वाटत नव्हतं!

काल संध्याकाळी तिचा निरोप घेतला त्यावेळेस किती हंसतखेळत बोलत होती ती. मी जिना उतरत असतांना ती म्हणाली होती "उद्या लवकर यायचं हं! नाहीतर-"

"नाहींतर काय?"

"फार रागवेन मी!"

"खरंच?"

"अन् नुसतं रागावणारच नाहीं तर-"

"तर काय?"

"कांही नाही! उद्याच सांगेन!"

मागें वळून मी झटकन् पुन्हां वर गेलो अन् तिचे दंड पकडले. माझं तोंड चुकवित ती म्हणाली "आता पुरे नाहो! असं काय करतां?"

"उद्याच्या उशीराबद्दलच्या क्षमेची याचना अगोदरच तुझ्या ओठावर लिहून ठेवतोय" आम्ही दोघेहि मोठ्यानं हंसलों होतो आणि आज-"

आज ती माझ्याशी 'जयंत' हा एक शब्द बोलली होती. कदाचित तो देखील अखेरचाच असू शकेल.

यापुढें तिचा सहवास कायमचा संपला. माझ्या विचारशक्तीला विलक्षण बधीरता आली आयुष्याच्या माळरानाला वणवा लागल्यासारखं मला वाटू लागलं.

रश्मीच्या सहवासांतले सारे प्रसंग माझ्या नजरेसमोर येऊन गेले. तिचा तो खेळकर आनंदी स्वभाव,-सहजासहजी भुरळ पाडणारं तिच्या डोळ्यातलं तें मिस्किल हास्य आणि तिचा लाडिक प्रणय-या साऱ्या गोष्टीतून निष्पन्न होणारं स्वर्गसुख मी कालपर्यंत अनुभवलं होतं मग आजच? आज तिनं हें काय केलं.

तिनं आत्महत्येचा प्रयत्न कां करावा याची मला कांहीच कल्पना येईना. असं काय झालं असेल कीं ज्यामुळे तिला विष घेण्याची इच्छा-मला एकदम त्या पत्राची आठवण झाली. झटकन् मी ते खिशातून काढलं अन् त्याची घडी उलगडली मला आश्चर्याचा दुसरा धक्का बसला! तें पत्र रश्मीनं मला उद्देशून लिहिलं होतं.

धडधडत्या छातीनं मी वाचूं लागलों.

"मला एकेकाळीं अत्यंत प्रिय असलेल्या जयंत—

तुम्ही हें पत्र वाचीत असाल त्यावेळेस माझा आत्मा हें शरीर सोडून निघून गेलेला असेल. तुम्हाला एक अनपेक्षित असा धक्का बसेल आणि थोडंफार वाईटहि वाटेल. कोणी सांगावं कदाचित वाटणारहि नाहीं. तुम्ही विचारांत पडाल कीं इतक्या आकस्मिकपणानं हिनं आपल्या आयुष्याचा शेवट कां करून घेतला असेल? स्पष्टच सांगू जयंत? त्याला कारण तुम्ही आहांत!

तुम्ही माझा विश्वासघात केला. माझं तुमच्यावर असलेलं असीम प्रेम तुम्ही धुळीला मिळवलंत. मी तुमच्यावर टाकलेल्या साऱ्या विश्वासाचा गैरफायदा घेऊन माझ्याच केसानं तुम्ही माझा गळा कापलात. हें असंच जर करायचं होतं तर प्रणयाचं तें सारं नाटक तरी कशाला केलंत?

खरंच, तुम्ही एवढें उलटया काळजाचे असाल असं मला कधींहि वाटलं नव्हतं. तुमचीं गोड भाषणं, आश्वासनं आणि लग्नाचीं वचनं हीं सारीं सारीं मला खरीं वाटलीं प्रणयाच्या उन्मादानं धुंद होऊन मी खऱ्या जगाचं अस्तित्व विसरून गेलें. कल्पनेच्या साम्राज्यांत तरंगतांना साऱ्या जगाला कस्पटासमान मानून मी वस्तुस्थितीकडे पाठ फिरवली.

पण आज अनपेक्षितपणें माझे डोळे उघडले. उघडले ते कायमचे मिटण्यासाठींच!

दुपारी वाचण्यासाठीं कांहींतरीं पुस्तक आणावं म्हणून आज सकाळीं मी तुमच्या खोलीवर आले होते. तुम्हाला त्याची कल्पनाहि नसेल कारण त्यावेळीं तुम्ही स्नानासाठीं बाथरूममध्यें गेला होता.

दार उघडून मी तुमच्या टेबलाकडें गेलें आणि मला आश्चर्याचा अन् उद्वेगाचा जबरदस्त धक्का बसला.

कारण टेबलावर एक पत्र पडलं होतं. तुम्ही तें तुमच्या जिवलग उषेला लिहिलं होतं. मी अशावेळीं येईन याची तुम्हाला कांहींच कल्पना नसल्यानं तुम्ही ते बेफिकीरपणानं तसंच पडूं दिलं होतं. मी तें पत्र वाचलं. त्यांतला प्रत्येक शब्द माझं अंतःकरण कापीत गेला. मी तुमची मामेबहीण आणि तुमचं माझ्यावर भगिनीप्रेम आहे काय? भगिनीला लग्नाचं वचन देणारे जगांतले पहिलेच बंधुराज दिसता तुम्ही!

जयंत, तुमच्या नीचपणाला उपमा देण्यास मराठी भाषा तरी समर्थ नाहीं. तुमच्यासाठीं मी माझ्या आईवडिलांचं मन दुखवण्यास तयार झालें. कॉलेजमध्यें आपल्या मैत्रीचा एवढा गाजावाजा झाला आणि त्यामुळें मला कॉलेज सोडावं लागलं तरी देखील मी त्याकडें लक्ष दिलं नाहीं कारण मी माझं भवितव्य सर्वस्वी तुमच्यावर सोपवलं होतं आणि तुम्ही माझा इतक्या अधमपणानं विश्वासघात कराल असं मला कधीं स्वप्नांतहि वाटलं नाहीं. पण आज मी हें काय पहाते आहे?

माझ्या साऱ्या आशा आकांक्षा तुम्ही पायदळीं तुडवल्यात! या दुःखाची भयानकता सहन करण्याची शक्ति माझ्या अंगांत नाहीं.

माझ्या आयुष्याची इतिकर्तव्यता आतां संपली. वीष घेण्याखेरीज मला आतां दुसरा मार्गच राहिलेला नाहीं.

जाते मी. पण त्यापूर्वी हात जोडून एक विनंति करतें कीं—तुमच्या त्या नव्या प्रेयसीला—उषेला—तरी माझ्यासारखा दगा देऊं नका."

तुमची—छेः आतां परमेश्वराची

—रश्मी

माझ्या हातांतून रश्मीचं पत्र गळून पडलं!

मला स्वतःला काय होत आहे, हेंच माझ्या डोक्यांत येईना.अंतःकरणांत खोल खोल कुठें तरी एक चिता पेटली होती. माझ्या विचारशक्तीचं उर्वरित छिन्नविच्छिन्न प्रेत त्या चितेंत जळत होतं. त्यांतून निघणाऱ्या अर्थशून्य कल्पनांचा काळाकुट्ट धूर माझ्या अंतःकरणांत कोंडून

राहिला होता. पायांशीं पडलेल्या पत्राकडें माझी नजर गेली.

रश्मीनं अर्थाचा केवढा विलक्षण अनर्थ करून घेतला होता. लघुकथेची नाविन्यपूर्ण सुरवात करण्याच्या हेतूनं मी सुरवातीलाच लिहिण्यास घेतलेलं तें पत्र–त्या पत्रानं माझ्या आयुष्यांत केवढी भयानक घटना घडवून आणली होती.

माझ्या काळजांत अग्नीच्या ज्वाळा उफाळल्या. मला खूप मोठ्यानें रडावंसं–ओरडावंसं वाटत होतं–पण माझ्या तोंडून एक शब्दहि बाहेर पडला नाहीं आणि डोळ्यांत अश्रूंचा एक थेंबहि उभा राहिला नाहीं. डोळ्यासमोर कांहीं क्षणापूर्वी घडलेल्या भयानक घटनेच्या तीव्रतेनं अश्रूंचा तो अनंत आणि अपार सागर पार शुष्क होऊन गेला होता कीं काय कुणास ठाऊक?

दोन्ही हातांनीं तोंड गच्च दाबून मी होतो तसाच पडून राहिलो.

कांहीं वेळानंतर खांद्यावर कुणीतरी हात ठेवल्याचा मला भास झाला. मी दचकून वर पाहिलं. ते डॉक्टर होते. डॉक्टरांना पहातांच मी ताडकन् उठून बसलो. मी त्यांच्या चेहऱ्याकडें नजर टाकली. त्यांचा चेहरा थकून गेल्यासारखा दिसत होता. मी ओळखलं, रश्मी, मला सोडून कायमची निघून गेली होती. माझ्या शरीरांतली उरलेली शक्तीहि नाहींशी झाली आणि मी हताशपणानं पुन्हां एकदा खुर्चीत अंग टाकून दिलं!

डॉक्टरांनीं प्रेमळ पणानं माझ्या पाठीवरून हात फिरवला अन् ते म्हणाले "इतक्या थराला कशी गेली रे ही गोष्ट जयंत?"...

शून्य नजरेनं जमिनीकडें पहात मी शांतपणानं बोलूं लागलों, "रश्मीनं माझ्याविषयीं भयंकर गैरसमज करून घेतला होता डॉक्टर, मी माझ्या नव्या लघुकथेसाठीं लिहिलेल्या पत्राचा सुटा कागद तिच्या हातांत गेला आणि तिला वाटलं.—जाऊंद्या. माझ्या आयुष्याचीच आज एक विलक्षण शोककथा झाली आहे. आजपर्यंत कुणाच्याहि आयुष्यांत इतकी भयानक शोकान्तिका घडली नसेल!"

"वेडा आहेस जयंत तूं!"

"माझ्या रश्मीवर असलेल्या प्रेमाची तुम्हाला कल्पना नाहीं डॉक्टर! मी वेडा नाहीं–वेडा नाहीं म्हणूनच मी जिवंत आहे! या दुःखानं उद्या मी कदाचित् वेडा होईन आणि रश्मी सारखंच वीष घेऊन मीहि तिच्या मागोमाग–"

"जयंत–जरा माझं ऐकशील तूं?"

"डॉक्टर माझं सांत्वन करण्याचा प्रयत्न करूं नका. आता माझं मन शब्दांनी शांत होणं शक्य नाहीं–त्यासाठीं मला माझ्या जिवाचं मोल दिलं पाहिजे. रश्मी गेली–" बोलतांबोलतां माझा गळा दाटून आला. "जातांना तिनं माझ्या-बद्दल कांहीं सांगितलं डॉक्टर? कदाचित तिनं मला हांक मारली असेल. अखेरचे दोन शब्द बोलून घ्यावेत म्हणून तिनं मला जवळ बोलावलं असेल–पण मी तिथें नव्हतो. कांहीं म्हणाली, ती डॉक्टर?"

डॉक्टरांचा चेहरा एकदम निराळा दिसू लागला. ते म्हणाले, तिचे अखेरचे शब्द? ती म्हणाली, 'डॉक्टर!' जयंतना पाठवून द्या माझ्याकडें!"

सहस्रावधी भावना उफाळून आल्यानं माझं हृदय भरून आलं अन् सद्गदित आवाजांत मी म्हणालों "खरं आहे तें. मला तिच्याकडे गेलंच पाहिजे. तिच्या मृत्यूला कारण मीच झालों. आतां तिला भेटण्याखेरीज – डॉक्टर, मला एखादं असं औषध द्या कीं त्यामुळें ताबडतोब झोप लागली पाहिजे आणि ती देखील कायमचीच!"

एक सुस्कारा सोडून डॉक्टर म्हणाले "हं! पाहिजे असेल तर देतो मी. उगीच एखाद्याच्या इच्छेच्या आड कशाला या? तुझ्या आत्महत्येला माझा कांहींच विरोध नाहीं–पण

त्यानंतर तुझी अन् रश्मीची भेट होणं शक्यच नाहीं !"

मी वेड्यासारखा त्यांच्याकडे पहात राहिलो —

"कारण – तू स्वर्गांत जाशील पण ती इथेंच असेल! पृथ्वीच्या – आशिया खंडांतल्या– –हिंदुस्थानांतील — पुणें शहरांतल्या — ससून हॉस्पिटलच्या रूम नं. २७ मध्यें!

"म्हणजे ?" आश्चर्यानं मी म्हणालो

"म्हणजे काय? जयंत लेका अगदीच 'लेखक' आहेस रे तूं? अरे, एकदां माझ्या हातांत आलेली केस कधीं हातची गेलेली पाहिलीस आजपर्यंत ? रश्मीच्या पोटांत गेलेलं सारं वीष बाहेर काढलं गेलं, तिला इंजिक्शन्स दिलीं आणि आतां ती शांतपणानं झोपली आहे."

"डॉक्टर!" हर्षोन्मादानं वेडा होऊन मी ओरडलो, "मग हें मला आधींच कां सांगितलं नाहीं ?"

"आधीं?" डॉक्टर हंसून म्हणाले "अरे, तुला हे एकदम सांगितलं असतं तर हार्टफेल होऊन आटपला असतास लेका. तुम्ही लेखक म्हणजे कसल्या जोरदार छातीचे प्राणी असता हें काय मला माहीत नाहीं? आजकालच्या तरूण पिढीला मी फार चांगल्या रीतीनें ओळखून आहे. बाबा! जीव देण्याची तर आजकाल तुमच्यामध्ये एक फॅशनच निघाली आहे. परीक्षेंत नापास झालं, नोकरी सुटली किंवा एखाद्या पोरीनं नाहीं म्हटलं कीं निघाले जीव द्यायला! अरे तुमच्या बावळटांनों! अरे जीव असा द्यावा कीं साऱ्या जगानं त्याचं कौतुक केलं पाहिजे! रॉकेटच्या सहाय्यानं मंगळवार जा, गौरीशंकराचं शिखर गांठायचा प्रयत्न करा, आफ्रिकेचीं रानं धुंडाळा, नाहींतर समुद्रांत दूरवर जाऊन कुठलंतरी एखादं नवीन बेट शोधून काढा. त्या प्रयत्नांत मेलांत तर जगांत तुमचं नांव तरी राहील. पण नाहीं – एवढी महागाची आत्महत्या तुम्हाला कुठली परवडायला? तुम्हाला रुपया दीडरुपयांत मरायला पाहिजेना! थांब जरा – मी 'आर्सेनिक' ची बाटली घेऊन येतो, आतां तुला तें घेतलंच पाहिजे!"

"डॉक्टर," मी ओशाळून म्हणालो "जाऊ द्या ना आतां तें! चुकलो मी. पण मला आधीं रश्मीला भेटूं द्या डॉक्टर!"

"अरे हो पण, जरा दमानं घे. भेटणारच ती. आहे पण थोडा वेळ तर थांबशील? तिला झोपेतनं एकदम उठवतां येणार नाहीं. आणि थांब – मला तिची पण जरा जिरवायची आहे. जीव देते आहे बेटी! हें बघ आतां असं करायच. आपण तिच्या खोलींत जाऊं या. तूं कांहीं वेळ पार्टिशनच्या मागे उभा रहा – आणि मी सांगेन त्याच वेळेला बाहेर यायचं, समजल?"

मी होकार दिला. डॉक्टर बाहेर गेले आणि कांहीं वेळानंतर परत आले. आंत येतांच त्यांच्या मागोमाग येण्यास त्यांनीं मला खुणावलं.

आम्ही दोघंहि रश्मीच्या खोलींत गेलो. डॉक्टरांनीं मला पार्टिशनच्या मागें उभं केलं आणि स्वत: आंत गेले. मला रश्मीला पहावसं फार वाटंत होतं – पण त्यावेळी तरी तें शक्य नव्हतं!

मी स्वतःशींच विचार करूं लागलो. एखादं विलक्षण स्वप्न पडावं अशा तऱ्हेच्या घटना प्रत्यक्षपणें माझ्या आयुष्यांत घडल्या होत्या – अन् घडत होत्या. माझ्या अर्ध्या तासापूर्वीच्या अन् आतांच्या मनस्थितींत जमीन अस्मानाचं अंतर होतं. आम्हा दोघांच्या जीवन्मृत्यूच्या सीमा किती झपाट्यानं बदलल्या गेल्या होत्या दैवगतीचं मला मनस्वी आश्चर्य वाटलं. खिडकीच्या निळ्या पडद्याआडून दिसणाऱ्या आकाशाकडे दृष्टि लावून मी एकएक क्षण मोजीत होतो.

थोड्याच वेळानंतर आंतून क्षीण आवाज आला, "मी कुठं आहे ?" तो आवाज रश्मीचा होता. धडधडत्या छातीनं मी पार्टिशनला कान लावून एकू लागलों.

"कसं काय – ठीक आहे रश्मीताई ?" डॉक्टरांनी सौम्यपणानं विचारलं, "घाबरूं नका तुम्ही सगुन हॉस्पिटलमध्यें आहांत"

"मी कशी आले इथं ? तुम्ही कोण ? कुणी आणलं मला?" "मी डॉक्टर देसाई. तुमचे जयंत देशपांडे म्हणून कुणी मित्र आहेत ना ? त्यांनीं तुम्हाला आणलं इथं!"

"जयंत" तिनं एकदम विचारलं "कुठं आहेत ते ?"

डॉक्टर कांहींच बोलले नाहीत.

"सांगा – सांगा ना डॉक्टर !"

"काय सांगायचं रश्मीताई ! " निराशेच्या आवाजांत डॉक्टर बोलूं लागले "ते सध्यां लिहीत असलेल्या एका लघुकथेच्या सुरवातीचं पत्र तुम्हीं वाचलंत–आणि तुम्हाला तें खरंच वाटलं ! आत्महत्येचा प्रयत्न करण्यापूर्वी थोडा तरी विचार करायला पाहिजे होता तुम्ही. सुदैवानं तुम्ही वाचलात पण तुमच्या मृत्यूच्या कल्पनेनं त्यांनी मात्र उरलेलं वीष घेऊन आत्महत्या केली."

"काय सांगता हें डॉक्टर?" रश्मीनं रडव्या आवाजात विचारलं "खरंच असं झालं! आई ग ऽ"

ती मोठमोठ्यानं हुंदके देऊं लागली.

"आतां दुःख करून काय उपयोग आहे रश्मीताई? पहिल्याप्रथमच तुम्ही या गोष्टीचा विचार करायला पाहिजे होता."

"डॉक्टर" ती एकदम आवेगानं म्हणाली "मग मला तरी तुम्ही बरं कशाला केलात हो? मला देखील त्यांच्या बरोबरच—"

—आणि उशींत तोंड खुपसून ती रडूं लागली.

'रश्मीताई, शांत व्हा जरा. हे पहा– आतां पूर्णपणें देवावर हवाला ठेवून रहा. त्याच्या पोटाचं ऑपरेशन करावं लागेल. मी माझ्या प्रयत्नाची पराकाष्ठा करतो. पाहूं या तुमच्या नशिबांत असलं तर–"

डॉक्टर मी तुमची फार फार—

"हं हं पुरे ! स्वस्थ पडायचं आतां कांहीं एक बोलायचं नाही. समजलं ?"

ते उठून दाराकडें चालूं लागले.

दारापाशीं आल्यानंतर त्याची एकदम माझ्याकडें नजर गेली. आटोकाट प्रयत्न करूनहि त्याना आपलं हंसूं दाबतां आलं नाहीं. ते मोठमोठ्यानें हंसायला लागले आणि हंसत हंसतच म्हणाले–

"आतां पाहातोस काय वेडपटा, जा ना आंत !"

ते बाहेर गेले आणि जातांना त्यांनी खटकन् दार लावून घेतलं. मी आश्चर्यानं तिकडे पाहिलं.

दाराबाहेरचा काळा पडदा त्यांनीं ओढून घेतला—आणि साऱ्या खोलींत अंधार झाला.

—o★o—

# मानव आणि त्याची संपत्ति

लेखक :—वसंत चाणेकर B.V.S.C. IIyr.

लोकशाही—मग ती जागतिक असो वा राष्ट्रीय—हळू हळू पण निश्चितपणें पुढें पावलें टाकीत आहे. तिनें पहिल्यापेक्षां किती पावलें पुढें टाकली, ती सध्यां प्रगतिपथावर आहे कीं नाहीं व असल्यास ती किती दिवसांनीं हें विश्व व्यापील वगैरे प्रश्न मुत्सद्दी सोडवितीलच. आज ती (लोकशाही) प्रगतिपथावर आहे की नाहीं हे शास्त्रीय दृष्टिकोनांतून पाहूं व त्याच दृष्टीनें तिची प्रगति कुठपर्यंत होऊ शकेल याचा आढावा घेऊं.

आज मानव इतका पुढें गेला आहे कीं तो आपल्या नैसर्गिक गरजा देखील यंत्राच्या सहाय्यानें पुऱ्या करूं शकतो. दहा मनुष्याचें काम एका अश्वशक्तीच्या एंजिननें पार पाडतो व दहा मनुष्याचें ओझें एका लिव्हरच्या धक्क्यानें उचलतो. अर्थात् जोपर्यंत या प्रगतीचें मोजमाप करण्याजोगें एकादें यंत्र सांपडत नाहीं किंवा तो स्वतः शोधून काढीत नाहीं तोपर्यंत या प्रगतीच्या आढाव्यावरच समाधान मनावे लागणार.

१९१७ पासून ते या घटकेपर्यंत जितकी खनिज संपत्ती भूमातेनें आम्हांस मुक्त हस्तानें दिली व ज्या सढळपणानें आम्ही तिचा विनियोग केला तसा विनियोग आम्ही त्यापूर्वीच्या २५,००० वर्षांपूर्वी क्वचितच केला असेल यात आश्चर्य वाटण्याजोगे कांहीं नाहीं. कारण प्रत्येक उद्योगधंदाच मुळीं त्यावर अवलंबून आहे आणि या सगळया उद्योगधंद्यांना जीवन देणाऱ्या वस्तु कोणत्या म्हणून प्रश्न केल्यास प्रत्येकजण सांगेल कीं पेट्रोल, कोळसा व विद्युत या होत. तेव्हां प्रथम या तीन उद्योगवाहिनीचा संचार पाहूनच पुढें गेलेलें चांगलें.

पेट्रोल नसेल तर विश्वाच्या या प्रचंड रहाटीचा कणाच मोडून पडेल. पेट्रोलच्या प्रचंड खपाचा अंदाजच द्यावयाचा असल्यास अमेरिकेचा दर साली जो प्रचंड व्यय चालू आहे त्यावरूनच होऊ शकतो. आज अमेरिकेस सालीना १५ लाख बॅरल पेट्रोल लागत आहे. समजा पेट्रोलचा हाच खर्च चालू राहिला तर जास्तींत जास्त अजून वीस ते तीस वर्षं कांहीं चिंता नाहीं. नवीन खाणी निघाल्या तरी पन्नास वर्षांहून जास्ती पुरेल असा सांठा नाहीं कल्पना करा, विहिरी व खाणी पेट्रोलविना कोरडया पडल्या आहेत, मोठमोठीं अजस्त्र यंत्रें गंज खात पडली आहेत आणि......कल्पनाच करवत नाही! खोल कुठेंतरी जातो आम्ही असें वाटते. अशा या तीव्र निराशेत आशेचा किरण दिसेल व तो म्हणजे शास्त्रज्ञांच्या बुद्धीमत्तेचा. या कोरडया ठणठणीत विहिरींतल्या गाळांतून त्यांनी पेट्रोल काढल्यास न कळे! पण हे देखील ६० टक्क्याहून जास्त निघणार नाहीं. समजा

पाणी आणि वायू यांस हवेच्या दाबासहित दाखल केल्यास १० टक्के जास्त निघेल पण पूर्ण १०० टक्के कधींच शक्य नाहीं. समजा हायड्रोजन आणि कार्बन यांच्या मिश्रणांनी पेट्रोल तयार होऊं लागलें तरी तें असें कितीसें होणार? व तयार केलें गेलेच तर नाकापेक्षां मोती जड असा प्रकार होणार! कारण ईग्लंड व जर्मनी या राष्ट्रांत हे प्रयोग झाले नाहींत असे नाहीं पण अशा कृत्रिम पेट्रोलचा खर्च नैसर्गिक पेट्रोलपेक्षा ४।५ पट अधिक झाला- तेव्हां हा प्रकार सोडून देण्यांत आला. पेट्रोलचा भाऊ म्हणून कांही शास्त्रज्ञांनी पॉवर अल्कोहलचाहि उल्लेख केला आहे. पण अल्कोहल मिळणाऱ्या पिकाची लागवड केली तर जमिनीची शक्ति नाहीशीं होते- याशिवाय धान्य टंचाई भासेल. ती वेगळीच.

आतां पेट्रोल कडून कोळशाकडे वळूं. यथें मात्र मन थोडेसें हलकें होतें कारण अत्यंत त्वरेने त्या खाणी उपयोगिल्या तरी आम्हास तीनहजार वर्षेपर्यंत पुरेल. अर्थात इथेंहि संशय आणि ठोकताळे यांना जागा आहेच. संशय हा कीं हा सगळा कोळसा उच्च प्रकारचा नाहीं व ठोकताळा एवढ्याकरितां बांधावयाचा कीं ज्या राष्ट्रांनीं हें भाकीत केलें आहे त्या राष्ट्राजवळ जगांतल्या अर्ध्याअधिक खाणी आहेत व कांहीं कारणांमुळें या कोळशाची समवाटणी झाली तर वरील मुदत कुठपर्यंत खरी आहे याविषयी शंका येणारच.

पेट्रोल व कोळशांकडून विद्युत् शक्तीकडें वळल्यास तेथेंहि याच अडचणी दिसतात. उंचीवरून पाणी पाडून कृत्रिम विद्युत्शक्ति निर्माण करण्याची आज सगळ्या राष्ट्रांना घाई लागली आहे पण अमेरिकेसारख्या धनाढ्य राष्ट्रांची फक्त ४'१ टक्के एवढीच गरज काय तीं ही वीज पुरविते. अशी स्थिति असतांना वीजनिर्मिती करण्यांत काम हंगील आहे, असें वाटणें अगदीं सहाजिक आहे.

तेव्हां पेट्रोल व कोळसा तर संपत आला, विद्युत् शक्तीचांही कथा अशा स्थितींत नवीन शक्ति मिळविण्याचे प्रयत्न न झाले तर मानव समाज कुठें जाईल हे काय सांगावयास पाहिजे? अशा प्रकारची नवीन शक्ति मिळविण्याचे प्रयत्न पुष्कळ ठिकाणीं झाले व होत आहेत. त्यापैकीं फरान्सचा प्रसिद्ध शास्त्रज्ञ क्लॉडचा प्रयत्न लक्षांत घेण्याजोगा आहे. विषुवृत्ताजवळील समुद्रसपाटीवरील व समुद्रतळांतील उष्णतामानांतील फरकाचा फायदा घेऊन त्यानें एक यंत्र बसविलें कांहीं जणांनी पवनचक्क्या उभारल्या, कांहींनीं (Tide motors) तयार केल्या तर वाफेच्या इंजिननें सर्वांवर ताण केली. पण येथेंहि एक अडचण उभी राहिली व ती ही कीं जेथें जेथें ह्या शक्ति सहजसाध्य आहेत ते प्रदेश उद्योगधंद्यानें समृद्ध नाहींत.

येथें अणुशक्तीचा विचार सहजच येण्यासारखा आहे. पण आतांच वर्णिल्याप्रमाणें तिचा प्रकार 'नाकापेक्षां मोती जड असाच होणार कारण अणूंना तोडण्यामध्येंच इतका खर्च होतो कीं त्यापासून मिळणारी शक्ति महागांत पडते. याशिवाय ही शक्ति तूर्त तरी सर्वसामान्य होण्याचे लक्षण दिसत नाही. तेव्हां त्याविषयीं विशेष विचार न केलेलाच बरा. परत आपल्या ध्रुवपदावरयायचे म्हणजे आपण फक्त पेट्रोल, कोळसा व विद्युत् यावरच अवलंबून आहोत. व या तीन्हींचा सांठा आज ना उद्या संपणार आहे. तेव्हां उद्याची काळजी असेल तर आजच हात राखून खर्च करावा नाहीं तर दुसरे उपाय शोधावे व शहाणपणाचा मार्ग खरा दुसराच आहे. कारण तळ्यांतलें पाणी किती दिवस पुरणार? तेंव्हां आपल्या बुद्धीची व मेहनतीची पराकाष्ठा करून आपण नवीन

होत पण अद्यापी उपलब्धनसलेल्या अशा सांठ्यास घातला पाहिजे व तो म्हणजे सूर्यापासून मिळणाऱ्या शक्तीचा सांठा हा होय. खरोखरच हा सांठा इतका अजस्र आहे कीं त्याचा एका मिनिटाचा व्यय एका वर्षाकरितां मानव समाजाच्या सगळ्या गरजा पुऱ्या करूं शकतो. हा गुप्त सांठा हातास लागण्याचा उशीर कीं मानव समाज नेहमीकरितां मुक्त होईल.

धातूंची(Metals)स्थिति वरील ज्वलनशक्तीहून किती तरी चांगली आहे. पण म्हणून अतिशय बेफिकिर होण्याचें कारण नाहीं कारण अमेरिकन भूगर्भशास्त्रज्ञांच्या विचाराप्रमाणें उपयुक्त धातूंचा असाच उपयोग होत गेल्यास, याच शतकाच्या अखेरीस त्यांची कमतरता तीव्रतेनें जाणवूं लागेल व हें संकट टाळावयाचे असल्यास आपणास तीन उपाययोजना आंखाव्या लागतील.

१) एकदा उपयोगिलेल्या धातूंचा फिरून एकदां उपयोग करणें. या उपायामुळें लोखंड २५ टक्के, शिसे ३० टक्के व जस्त १० टक्के परत मिळूं शकतात.

२) दुसरा उपाय टेक्नालॉजीचा आहे. यामुळें धातूस अशुद्धावस्थेत मिळवितां येते. यापासूनच मूळधातू प्राप्त केली जाते. यामुळें भूगर्भातील धातू तशीच रहाते. उदाहरणार्थ अल्यूमिनियम या धातूस थेट खाणीपासून मिळविण्याऐवजी जर चिकण माती वगैरे पदार्थांपासून संपादल्यास तिचा उपयोग पुष्कळ काळपर्यंत होऊं शकतो.

३) तिसरा उपाय हा कीं, दुर्मिळ धातूंच्या ऐवजी सहज मिळणाऱ्या धातूंचा उपयोग करण्यांत यावा उदाहरणार्थ अल्यूमिनियमया धातू ऐवजो लोखंडासच उपयोगांत आणावे.

अल्यूमिनियमची 'टेन्सीच्या' जवळ सांपडणाऱ्या चिकण मातीपासून तयारी व मॅगनेशियमची 'फरीबोट' जवळ डॉन केमिकल कंपनीनें समुद्राच्या पाण्यापासून केलेली तयारी उल्लेखनीय आहे. यामुळें कित्येक वर्षें या दोन धातूंच्या विवंचनेंतून आपण मुक्त होऊं.

या सर्व विवेचनावरून दिसून येईल कीं धातूंच्या विवंचनेतून मुक्त होण्याकरितां वरील उपाय तर अंमलांत आणले गेले पाहिजेतच याशिवाय जागरूक व दूरदर्शीपणानें इतर विलेचनांची संशोधक बुद्धीनें चिकित्सा केली पाहिजे व त्यांतून मुक्त होण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. मानवाच्या सम्पत्तीचा तिसरा हिस्सा जमिनीनें व्यापला आहे. उद्योगधंद्यात आपण कितीहि भरभराटीत असलो तरी अन्नासाठीं जमिनीवरच अवलंबून रहावे लागते याशिवाय सर्व उद्योगधंदे जमिनींतील उत्पन्नावरच अवलंबून आहेत. शेतकीविषयक शिक्षण शिबिरें, ट्रॅक्टर्स व अनेक किसानसभा असूनहि जमीन अजून पडीकच आहे. याचें कारण जमिनीची शक्ति वाढविण्याकडे दुर्लक्ष झाले हें आहे व अस लेली शक्ति देखील नाश पावत शेतकी व जंगल खात्यांच्या प्रयत्नामुळें जमिनीचीं नष्ट झालेली शक्ति परतत आहे. पण तिची शक्ति वाढविण्याचा प्रश्न गुलदस्त्यांतच आहे. वास्तविक पहातां शेती हा एक फार मोठा व्यवसाय आहे व तिचे प्रश्न शास्त्रीय व टेक्नॉलॉजिकल शास्त्रांत मोडतात. याचकरितां हे प्रश्न शास्त्रज्ञांनी व टेक्नॉलॉजिस्टांनी सोडवावयास पाहिजेत.

केवळ लोकशाहीची प्रगतीच नव्हे तर मानवी वंशाची प्रगति उपरीनिर्दिष्ट संपत्तीच्या काटकसरीनें व फायदेशीररीत्या उपयोग करून घेण्यावरच अवलंबून आहे. आपल्या गैरसावधगिरीमुळें किंवा निष्काळजीपणामुळें या प्रश्नांकडे लक्ष देण्याच्या अगोदरच हा सगळा सांठा संपेल व बैल गेला नि झोंपा केला अशीहि परिस्थिति कदाचित येईल. तरी या धोक्यास टाळण्यासाठीं आपण त्वरित लक्ष दिलें पाहिजे. अशा स्थितींत या संपत्तीचा ओघ सतत चालू रहाण्यासाठीं शास्त्रीय संशोधनांची वाट आपल्याला त्वरेनें चालावयास नको काय ?

# अचुक भविष्य

लेखक:—
अनंत महादेव सोहोनी,
बी. कॉम. ज्यू.

गेले कांहीं दिवस रुद्रभट पुरोहित जवळ जवळ निराळ्याच जगांत वावरत होते. त्यांच्या आधींच सतेज आणि गंभीर असणाऱ्या मुद्रेवर कांहीं दिवसापासून अर्धस्फुट हास्य प्रकट होऊं लागले होते. त्यांचा मनोनिग्रह अतिशय दांडगा होता. त्यांच्या चेहऱ्यावर गंभीर प्रसन्नतेखेरीज इतर भाव दिसत नसत. आपल्या विशाल हृदयांत अगदीं सर्वच्या सर्व विचार कोंडून ठेवण्याची शक्ति त्यांच्याजवळ खात्रीनें होती. कधींहि यत्किंचितहि विचलित न होणाऱ्या रुद्रभटांच्या मुखावर मग हसूं कसे? असा कोणता मोठा अत्यानंद त्यांना झाला होता? त्यांच्या हृदयाची अनंत बंधनें झुगारून त्यांच्या मुद्रेवर विलसणारा आनंद खरोखरीच असामान्य असला पाहिजे. रुद्रभट पुरोहितांच्या अंग कांतींत व मुखमंडलावरून तेज ओसंडून जात होते. त्यांत कमी काहीच न होता उलट रोज त्यांची अंगकांती अधिकाधिक तेजःपुंज होत होती. मग त्यांच्या तोंडावर स्मित कसें? खास त्यांना कसलातरी अनुभूत आनंद झाला होता. अशी कोणती घटना घडली होती कीं ज्यामुळें त्यांना हा अगदी परमावधीचा आनंद झाला होता?

सध्यांचें त्यांचें रहाण्याचें ठिकाण, त्यांची रहाण्याची जागा आणि रहाण्याची पद्धत पाहून कोणालाहि असें वाटलें नसतें कीं रुद्रभट मृत्युंजयभट पुरोहित ही व्यक्ति एके काळीं प्रमुख शहरांतून वास करीत असे व रेल्वेंत नोकरी करीत असें. रुद्रभटांचे वडील अर्थातच आडनांवाप्रमाणें पुरोहित होतें. रुद्रभटांचें बालपण अगदीं एखाद्या आश्रमस्थाप्रमाणेंच गेलें होतं. ते जरी इंग्रजी कामापुरतें शिकले होते तरी त्यांचा संस्कृताचा व्यासंग दांडगा होता. वडिलांप्रमाणेंच त्यांनी बराच काल अध्ययन अध्यापनांत घालविला होता. परंतु पुढें केलेल्या अविरत तीस वर्षांच्या रेल्वे नोकरीमुळें त्यांचा संस्कृतीशीं संबंध बराच दुरावला होता. रेल्वेची नोकरी म्हणजे उठले कीं जायचें कामावर आणि निजावयास घरीं परत यावयाचें. रेल्वेच्या नोकरीमुळें त्यांना एका गोष्टीची फार मोठी सोय झाली होती आणि ती म्हणजे प्रवासाची.

अगदीं रेल्वेच्या या टोकांपासून त्या टोकापर्यंत प्रवास बिनखर्चात करतां येई. दरवर्षी त्यांची कुठे ना कुठे यात्रा निघावयाचीच हिमालय ते कन्याकुमारी, बारा ज्योतिर्लिंगांची त्यांनीं दर्शनें घेतली. चारी धामाच्या यात्रा त्यानी यथासांग केल्या सर्व प्रमुख धार्मिक स्थळी तर ते गेलेच पण अगदीं बारीक सारीक स्थळेहि त्यांनी सोडली नाहीत. या व्यतिरिक्त इतरहि ऐतिहासिक प्रेक्षणीय स्थळे त्यानी पाहिली. नोकरीच्या तीस वर्षाच्या काळात त्यांच्या आयुष्यांत अर्थातच बरेच बदल झाले. नोकरी लागल्यावर कांही कालाने त्याच्या वडिलांनी या जगाचा निरोप घेतला. त्यांनी मध्ये थोडा काळ गृहस्थाश्रमाचा आश्रय घेतला होता पण ते गृहस्थाश्रमात विशेष यशस्वी तर ठरले नाहीतच नि पण ते परत ब्रह्मचर्याश्रमात ढकलले गेले. त्यांची पत्नी आणि नवसायासाने त्याना प्राप्त आलेली कन्या' या दोघीहि पुरोहिताना सोडून पाठोपाठ देवाघरी चालल्या झाल्या. या सर्व गडबडीत रुद्रभटाना कसा कोण जाणे पण ज्योतिष्याचा अतिशय नाद लागला. त्याना ज्योतिष्यशास्त्राच्या अभ्यासापुढे काहीच सुचेना. हजारो कुंडल्या अन् शेकडो पचांगांच्या पसाऱ्यातून सुटून जेवावयास खावयासमुद्धा उठावयास फुरसत मिळेना.

ठराविक ग्रहाच्या ठराविक हालचालीचा परिणाम म्हणून ठराविक घटना पृथ्वीवरील मानव जातीमध्ये घडत असतात हा त्याचा सिद्धांत होता व तो त्यांना सिद्ध करावयाचा होता. व त्याच दृष्टीनें त्याचा अभ्यास अगदी कसून चालला होता. कोणते ग्रह कोणत्या स्थितीत आले असतां कोणत्या घटना घडतील याचा त्यांना शोध लावायचा होता. नोकरीचा त्याना अगदीं संताप येई पण कोणते ग्रह कसल्या स्थितींत, कोणत्या स्थानी आले कोण जाणे ज्यांना नोकरी सोडण्याची विपरीत बुद्धि झाली नाहीं त्यांनी उरलेली चारपांच वर्षे कशीबशी नोकरी केली व त्यामुळे मिळणाऱ्या पेन्शनमुळें त्यांच्या पुढील आयुष्याला आर्थिक स्थैर्य प्राप्त झालें. लोक काय हस्त सामुद्रिकाच्या अगदी निव्वळ थापा ऐकूनसुद्धां त्याला पैसे देऊन मदत करतील पण ज्योतिष्यशास्त्रात संशोधन करणाऱ्या येडप्याला कोण दारापुढे उभे करणार? कोण देणार थारा? फार बरे झाले त्यानी पेन्शन मिळेपर्यंत पूर्ण नोकरी केली त्यानी नोकरी सुटतांच आपले सर्व बिऱ्हाड–होतेच काय म्हणा पंचांग पुस्तकांशिवाय – नावडतोब गांवी नेले. इतर सर्व सारखा सारव, निरवानिरव केली आणि आपल्या गांवी आपला आश्रम स्थापन केला.

त्यांच्या गांवी आल्यावर मात्र त्याना आपले सारे लक्ष आणि तन मन धन आपल्या ज्योतिष्याच्या अभ्यासावर केंद्रित करणें शक्य झाले. त्यांच्या मागे सांसारिक पाश आता काहीच नव्हता बायको, मुलगा गेली ही त्याना अगदीं इष्टापत्तीच वाटल्याखेरीज राहिली नाहीं. पेन्शनची रक्कम दरमहा आपल्या खात्यावर चढवावयाचें काम त्यानी एका बँकेच्या छोटयाशा शाखेच्या स्वाधीन केले. दर महिन्याला एकदा त्यांना बँकेत जावे लागे व त्याच दिवशीं ते आपल्या गरजेच्या सर्व वस्तू आणून टाकीत असत. स्वयंपाक ते स्वतःच करीत. आपलें धुणे स्वतःच पिळून टाकीत. देवदर्शनाकरिताच फक्त ते बाहेर पडत आपली दिनचर्या त्यानी अगदी ठरवून टाकली. ती ठराविक दिनचर्या ते अतिशय काटेकोरपणे पाळीत. त्यांनी आपला अभ्यासाचा विषय सर्वांना सांगितला होता

"कठोर तपश्चर्येशिवाय सिद्धी प्राप्त होत नसते" हे त्याचें मत होतं. कधी कोणी त्याच्या प्रमाणाबाहेर मेहनतीबद्दल बोलू लागल्यास ते वरील उत्तर देऊन त्याचें समाधान करीत. बहुतेक सर्वच त्याच्या अभ्यासाविषयी उदासीन असत पण कांहींचे समाधान त्याच्या ज्योतिष्याच्या सिद्धाताने होत नसे कोणी त्याच्या ज्योतिषावर विश्वास ठेवावयास तयार नसत पण त्यांच्याशी ते कधी वादविवाद करीत नसत. फारतर म्हणत "आपल्यात अगदी मुळांतच मतांतर आहे. वादानें फक्त कंठशोष होईल."

अशा प्रकारे रुद्रभटांची तपश्चर्या चालू होती. ते अभ्यास अगदी सविकल्प समाधि लावून करीत असत. विशिष्ट ग्रह, विशिष्ट दशेत विशिष्ट वेळी आल्यास, विशिष्ट घटना विशिष्ट स्थळी घडतात. ते कोणते ग्रह, त्याची कसली दशा, कोणत्या वेळी काय घटना कुठे घडेल इत्यादीचा अभ्यास ज्योतिष्यशास्त्रसागराच्या अगदी तळापर्यंत जाऊन ते करीत असत. या शास्त्रोदधींत बुडी मारल्यावर आणि त्यांचें मंथन केल्यावर त्यांना त्यांतील रत्नें हाती लागणार होती. रुद्रभटांच्याच शब्दांत सांगावयाचे म्हणजे त्यांना "सिद्धी" प्राप्त होणार होती. अशाप्रकारे भविष्य जाणण्यासाठीच ज्योतिष्याचा अभ्यास रुद्रभट करीत होते. तपश्चर्या पूर्ण होताक्षणीच त्यांना भविष्य अगदी अचूक वर्तविता येणार होते. त्या सिद्धीच्या क्षणाची ते अहोरात्र प्रतीक्षा करीत होते आणि रात्रंदिवस तिचे आवाहन करीत होते.

× × ×

आणि थोड्याच दिवसापूर्वी त्यांना सिद्धी प्राप्त झाली होती त्याना आता भविष्य अगदी अचूक वर्तविता येणार होतें. धन्य तो दिवस. धन्य तो क्षण. त्यांना त्या क्षणापासून कुठले ग्रह कुठल्या स्थितीत आले असतां काय घटना घडेल, केव्हां घडेल, कुठे घडेल वगैरेचे ज्ञान होणार होते त्या दिवसापासून त्यांना इतका आनंद झाला होता की तो त्यांना आपल्या अंत:करणांत दडवून ठेवतां येत नव्हता व त्यांच्या चेहऱ्यावर सदा मदस्मित झळकू लागले.

त्या दिवसांपासून त्यांनी आपल्या सिद्धीचा पडताळा पहाण्यास सुरवात केली. अर्थातच सर्व बाबतीत त्यांचें भविष्य शंभर टक्के सत्य ठरू लागलें. अगदीं घरगुती प्रश्नापासून तो अगदी महत्वाच्या सरकारी निर्णयापर्यंत सर्वच बाबतींत त्यांचें भविष्य तंतोतंत खरे ठरू लागले. शेजारच्या रमा काकूना त्या सोमवारी बाळंत होऊन मुलगा होईल, किंवा गणपुले सावकाराची तान्हे मांगावरची चाललेली हायकोर्टातील केस त्याच्यावर उलटेल, सिकंदराबादेच्या येत्या शनिवारी होणाऱ्या रेसमध्ये अमुक अमुक घोडे जिंकतील अशी अनुमाने ते काढीत. ते आजकाल गांवांत चौकशा करीत हिंडत आणि आपले अनुमान खरे ठरलेले त्यांना कळलें की ते अतिशय आनंदित होत आणि द्विगुणीतोत्साह-होत्साते घरी परतत.

एके दिवशी त्यांना एका अपघाताची बातमी लागली आणि दुसरे दिवशी ऐकतो त्याना समजलें कीं तो अपघात खरोखरच झाला होता आणि त्यांना अगोदरच समजले होते त्याप्रमाणे अगदी बरोबर सोळा माणसे ठार झाली होती. अगोदर यत्किंचितहि कल्पना असती तर अपघात खात्रीनें टळला असता असें कित्येकाचें मत पडले. अरेरे, रुद्रभटांचे मन त्याना खाऊ लागले की अपघाती प्रसंग अगदी सहज टाळण्याजोगा असून त्या दृष्टीनें त्यांनी प्रयत्न केला नाही. हे सिद्ध लोक मोठे विचित्रच असतात. रुद्रभटांनीं ठरवून

टाकलें होतें कीं स्वतःच्या फायद्यासाठी शक्यतो सिद्धीचा उपयोग करावयाचा नाहीं. त्याना रेसेसमध्यें अक्षरशः लाखो रुपये मिळविणें अगदीं सहज शक्य होतें पण त्यानी तसे केलें नाही. मग त्यांना असा विचार पडला की मानसिक आनंदाचा उपभोग घेण्याखेरीज कशालाच त्यांची सिद्धी उपयोगी नाही की काय ? निदान निरपराध लोकाचे प्राण तरी वांचविलेच पाहिजेत. नाही तर काय त्या सिद्धीचा उपयोग? त्यांनी मनाशी ठरवून टाकलें की अपघातांचे प्रसंग टाळावयाचेच.

त्याना एक दिवस कळलें की एक म्हातारा भर रस्त्यावर एका मॅकट्रकच्या धक्क्याने पडून मरणार व मोटर तशीच पुढे जाणार. त्यांना बालंबाल खात्री होती की आपण हा अपघात नक्की टाळू शकू.

रुद्रभट मृत्युंजयभट पुरोहित दुसऱ्या दिवशीं सकाळी उठून वेळवर त्या रस्त्यावर गेले. अगदी सकाळीं सातची वेळ. रहदारी जवळ जवळ नव्हतीच. योग्य वेळीं एक म्हातारा तेथें आला. अगदी अचुक भविष्य. थोडयाच क्षणांत दुरून मॅकचा आवाज ऐकूं येऊं लागला. रुद्रभटानी पाहिले तो ते धुड वेगानें येत होते आणि तो म्हाताराहि चक्रमसारखा त्याच वेळी रस्ता ओलांडूं लागला वाटतें. अगदी अचूक. रुद्रभट ओरडले आणि धांवले आणि अरेरे...धक्का फारच जोरात बसला. ते एकदम पडले मागे,त्यांचा आत्मा चिरंतनांत विलीन झाला. ती भुरकट रंगाची मॅक ट्रक न थांबवता निघून गेली होती.



# दान

यशवन्त कानिटकर

मी मेघ होउनी ल्यालो सुवर्ण रंग
दवं बिंदु चुंबनी रविकर बनुनी दंग
कधिं चंद्रमिषें मी आलिंगी कुमुदिनी
किति रती भोगिल्या होउनि मदन अनंग

जे गूज गुंजले तुझ्या चुटुक ओठांत
जे राग रंगले तुझ्या मदिर नयनांत
अगांगीं भिनले बनून जे विषधार
ते वदतां मी, कां करिशि उद्याची बात.

रुबाया

# एक महान् प्रयोग

जीवनाच्या सर्व क्षेत्रात सतत नवेनवे प्रयोग करण्याची प्रवृत्ति भारतांत प्राचीन काळीं मोठ्या प्रमाणावर दिसून येत होती. हे प्रयोग चालू होते तोपर्यंत भारताच्या जीवनात सर्वांगीण प्रगति होतच गेली. जीवन-विषयक तत्त्वज्ञान घ्या अथवा अध्यात्मिक तत्त्वज्ञान घ्या, भारतानें मूलगामी दृष्टीनें प्रयोग केले. या प्रयोगांच्या फलितावर समाजाने विचार केला. आलेले अनुभव जमेस धरले व तदनुसार जीवनाची आखणी केली म्हणूनच भारताला भौतिक जीवनांत व अध्यात्मिक क्षेत्रात प्रगति करता आली.

प्रयोगाची परंपरा भारतांत चालू होती तोपर्यंत भारतीय जीवनाचा संकोच झालेला नव्हता. नवे ध्येय, नवी क्षितिजे, नवे क्षेत्र यांचें संशोधन चालू असे. जीवनाला गति होती म्हणूनच समाजाची प्रगति होत होती. राज्यशास्त्र, समाजशास्त्र, इत्यादि अनेक शास्त्रात नव्या नव्या सिद्धांताची भर पडत होती. जीवनास समृद्ध करणारी संपत्ति सतत जोडली जात होती.

प्रयोगाची ही परंपरा खंडित झाली. नवीं ध्येये शोधण्याचें नव्या क्षितिजाच्या संशोधनाचें कार्य स्थगित झालें. त्यामुळे जीवनाचा संकोच झाला, क्षेत्रांचा संकोच झाला, नव्या संपत्तीचे मार्ग बंद झाले. पदरी असलेल्या संपत्तीचीच महती गाण्यांत येऊ लागली. ज्ञानाच्या क्षेत्रांतील मुलुखगिरी बंद झाली. असलेल्या ज्ञानावर प्रतिष्ठेचीं पुटें तेवढी चढू लागलीं. या पुटामुळे ज्ञानाला शोभा आली पण उजाळा मिळाला नाही. प्रतिष्ठा प्राप्त-झाली पण पराक्रम भेटला नाही, श्रीमंती आली पण वैभव आले नाही. पाण्याचे वैभव प्रवाहित्वांत असते. ज्ञानाचे वैभव गतिमानतेत असते. प्रवाह आणि गति बंद झाल्याबरोबर प्रगतीचे मार्ग रोधले गेले, अधोगतीचे मार्ग खुले झाले.

अधोगति प्रगतीच आहे असे मानून किती तरी दिवस आम्ही चालतो. उशीरा, फार उशीरा आम्हाला आमच्या गतीची दिशा समजली. खेद वाटला, दुःख झाले, धीर सुटला, गति बदलायला पाहिजे ही जाणीव निर्माण झाली. परंतु गति बदलावयाची कशी? अनेकांनी आपले सिद्धांत मांडले, प्रमेय विशद केली, कारिका सांगितल्या, सूत्रे ग्रथिली, भाष्य लिहिली पण गतीची दिशा बदलली नाही!

याच काळांत एक महान् प्रयोग सुरू झाला. प्रथम कित्येकांनी या प्रयोग-कर्त्यास वेड्यात काढले तरीहि प्रयोग चालूच होता. कित्येकांनी या प्रयोगाची विफलता पटवून देण्याचा प्रयत्न केला, तरीहि प्रयोग चालूच होता. रणाविना स्वातंत्र्य मिळत नसते असा

इतिहासाचा पुरावा पुढे मांडण्यांत आला. लाठीचे हल्ले झाले, बंदुकीचे बार उडाले, विमानांनी आग पाखडली. नियतीनें दुर्दैवाचा सडा टाकला. तरीहि प्रयोग चालूच होता.

आणि एकेरात्री–मध्यरात्र कलतांच हा महान प्रयोग सफळ झाला. रणाशिवाय स्वातंत्र्य मिळालें. पण त्यागाशिवाय मात्र तें मिळालें नाही. बलिदानाविना तें जवळ आलें नाहीं. प्रयोगावांचून तें प्राप्त झालें नाहीं. जगाच्या इतिहासांत तो एक महान प्रयोग ठरला

दुसराहि एक महान प्रयोग गेल्या महिन्यांत भारतानें केला. प्रौढ मतदान पद्धतीवर एवढ्या-मोठ्या प्रमाणांत जगांत प्रथमच घडलेली निवडणूक भारताने घडविली. साऱ्या जगाचें लक्ष या प्रयोगाकडे लागलें होतें. आमचें छत्र दूर होऊं द्या भारतांत अराजक माजेल अशी पूर्वीच्या राज्यकर्त्यांची शापवाणी खरी ठरली नाहीं. त्याचप्रमाणें एवढ्या मोठ्या प्रमाणांत झालेल्या निवडणुका गोंधळाशिवाय पार पडणार नाहीत अशी अनेक तज्ञांनी केलेली भाकितेंहि खरी ठरली नाहीत. सतरा कोटी प्रौढ मतदारांपैकीं ८ कोटींनी मतदानाचा हक्क बजावला अमेरिकेंत ३७ सार्वत्रिक निवडणुका झाल्या असल्या तरी १९४८ साली फक्त ५३ टक्के मतदारानीं मतदान केले होते. त्यामानानें पहिल्याच निवडणुकींत भारतानें केलेले मतदान कौतुकास्पद, अभिमानास्पद नाहीं असें कसें म्हणता येईल? परकीय राष्ट्रांनीं सुद्धां भारतांत झालेल्या निवडणुकांविषयी प्रशंसोद्गार काढले आहेत. परवांपर्यंतच्या विरोधकांनीं 'स्नेहाचे' सल्ले देण्यास प्रारंभ केला आहे. पहिल्या प्रयोगानें भारताला भारतीयत्व प्राप्त झाले तर दुसऱ्या प्रयोगाने भारताच्या प्रतिष्ठेत भर पडली.

तरी प्रयोगांची परंपरा आणखी पुढे चालूं रहावयाची आहे. स्वातंत्र्य मिळाले, लोकशाही राज्याची प्राणप्रतिष्ठा झाली तरी भारताच्या आत्म्याची प्रतिष्ठा अद्याप प्रस्थापित करावयाची आहे. पारतंत्र्याच्या काळात आपल्यावर जमलेली काजळी दूर करावयाची आहे. एकराष्ट्रीयत्वाची भावना दृढ करावयाची आहे. युगानुयुगे आपल्या पासून दूर झालेली ज्ञानाची गंगा पुन्हां ओघवती करावयाची आहे. त्याचप्रमाणें पारतंत्र्याच्या काळांत संकोच पावलेलें भारताचें विशाल आत्मत्व जागृत करावयाचें आहे.

दोन प्रयोग यशस्वी झालेले असले तरी हा तिसरा महान् प्रयोग चालू ठेवलाच पाहिजे.

— **विद्याधर.**

# आमचें मनोगत



'प्रकाश' चा हा अंक वाचकांच्या हातीं देतांना आम्हांपासून अंतरलेल्या आर्टस् कॉलेजेतर शेकडों मराठी प्रेमियांना तो मिळत नाही याबद्दल खेद वाटत आहे. या अंकाच्या सुरुवातीस दिलेल्या मराठी संघाच्या अहवालांत म्हटल्याप्रमाणें आर्टस् कॉलेजच्या घटनेनें देशिभाषिकांची संघटना तोडण्याचा जणू चंगच बांधला आहे. विद्यापीठाच्या आवारांतील सर्व कॉलेजांतील विद्यार्थ्यांचें प्रातिनिधिक म्हणून आतांपर्यंत एकच संयुक्त नियतकालिक निघत असे पण यावर्षापासून प्रत्येक कॉलेजचें निराळें नियतकालिक निघावे असा निर्णय विद्यार्थ्यांना पूर्वसूचना न देतां वरिष्ठांनीं घेतला व आज आर्टस् कॉलेजचें निराळें नियतकालिक प्रकाशित होत आहे.

आर्टस् कॉलेजाव्यतिरिक्त इतर कॉलेजांतील नियतकालिकें इंग्रजीत अथवा उर्दूत निघतील पण प्रांतिक भाषांना इतर कॉलेजच्या नियतकालिकांत स्थान मिळणार नाही. यासाठीं या वर्षाच्या सुरुवातीपासूनच आम्ही कसोशीनें प्रयत्न केला व सर्व कॉलेजचें निदान मातृभाषेपुरतें तरी एकच नियतकालिक असावें असें आमचें म्हणणें होतें.

फक्त आर्टस् कॉलेजांतील मराठी मातृभाषी विद्यार्थ्यांसाठीच आज हा 'प्रकाश' चा अंक निघत आहे. हजाराच्या वर ज्या नियतकालिकाच्या प्रति निघत त्याच्या आज अत्यंत प्रयासाने फक्त दोनशे प्रति निघत आहेत. हीच परिस्थिति राहिली तर मराठी संघाच्या अस्तित्वाप्रमाणेच 'प्रकाश' चें अस्तित्वहि धोक्यात आहे असें आम्ही आजच सुचवून ठेवीत आहों.

नाही तरी हे वर्ष अत्यंत त्रासाचें व कटकटीचें गेलें. कोणतेहि काम सुरळीत होईल तर शपथ! प्रत्येक कामांत सतरा विघ्ने!! संपादकमंडळाच्या कार्यकारी समितीच्या बैठकीत, "प्रत्येक कॉलेजचें निराळें मुख्य नियतकालिक निघण्यास आमचा विरोध नाही पण प्रत्येक विद्यार्थ्याला मग तो कोणत्याहि कॉलेजचा असो आपल्या मातृभाषेत निघणारा अंक मिळालाच पाहिजे" असा ठराव मीं मांडला होता पण इतरदेशिभाषिकांचें सहकार्य न मिळाल्यामुळे म्हणा किंवा इतर कॉलेजांतील आमच्याच मराठी बांधवांचा मिळावा तसा पाठिंबा न मिळाल्यामुळे म्हणा तो ठराव पास होऊ शकला नाही आणि आज हा आर्टस् कॉलेजचा 'प्रकाश'चा अंक तुमच्या पुढे आहे

आम्हा मराठी भाषिक विद्यार्थ्यांची मायभाषेसंबंधीची ही उदास वृत्ति अत्यंत घातुक आहे. आपण एकत्रित होऊन मराठी संघासाठीं व नियतकालिकांसाठीं झगडा दिला पाहिजे.

उस्मानिया विद्यापीठांतील मराठी भाषेच्या या दुरवस्थेकडे मी सर्व महाराष्ट्रीय नागरिकांचें लक्ष वेधू इच्छितो. हा फक्त विद्यार्थ्यांचाच प्रश्न नसून प्रत्येक मराठी भक्ताचा आहे. सर्वांचा जर जोरदार पाठिंबा मिळाला तर आम्हाला महाराष्ट्र शारदेच्या मंदिरांत निःशंकपणे प्रवेश मिळेल व जन्म देणाऱ्या मातेहूनहि श्रेष्ठ असलेल्या मातृभाषेची सेवा करण्याचें भाग्य लाभेल.

या अंकांत इतर कॉलेजांतील विद्यार्थ्यांचे लेख यासाठीच घेतले आहेत की त्यांच्याहि साहित्यिक वृत्ति बहरून यावयात व 'प्रकाश'च्या मौल्किकतेंत भर पडावी.

या वर्षी घडलेल्या घटनांपासून धडा घेऊन आमचे भाषाबंधू एकत्रित येतील व सबंध मराठी विद्यार्थ्यांचा हा 'प्रकाश' थाटानें प्रकाशत राहील अशी आशा करावी ना?

"देश ही मानवी सृष्टि होय. देह मृण्मय नसतो, तो चिन्मय असतो. माणसें जर प्रकाशमान असतील तर देश प्रकाशित होईल. सुजलाम सुफलाम् भूमीची कथा आपण जितक्या उच्च कंठानें घोषवू तितकें जबाबदारीचें ओझें वाढेल माणसाच्या हातून जर देशांतील जल सुकून जाईल, फळ मरून जाईल, मलयजवात जर मारक जंतूमुळे विषारी बनेल, सस्यभूमि जर वंध्या होईल तर देशाची लाज कांहीं काव्य कथेनें झाकली जाणार नाही."

— रविन्द्रनाथ टागोर

'मनुष्यांत दगड आणि ईश्वर या दोहोंचें एक मीलन झालेलें असतें. माणूस म्हणजे काय? चेतनामय दगड."

-- महात्मा गांधी

# झरा पाहिजे मला आंतला

म्हणती हातीं कुदळ कशाला,
खडक काय हा फोडित बसला॥
जमीन तरी कां ही कामाची?
कां शेतीच्या उपयोगाची?
हौस कशाला व्यर्थ श्रमाची?
कळेनाच कीं या वेड्याला १

थोडी भंवती दृष्टी टाका
बघा मुलें अन् पुरुष बायका
त्यांचे हेतू ध्येय ओळखा
येते कां लक्षांत तुम्हाला? २

उत्तरदायी बनाल काळी
कुठची पुंजी असेल जवळीं?
एशा कामें, फोल कपाळी,
चाकोरींत जा, उठा अन् चला ३

गांठी तुमच्या असेल कांहीं
तरीच नातें गोतें होई
बाजाराची रीत असें ही
मोल न तुमच्या दुज्या गुणाला ४

उत्तरः—उपयुक्ताचें ज्ञान नको मज
असे न पुंजीशीहि काज
वेडा वा कुणी खुळा म्हणा मज
झरा पाहिजे मला आंतला ५

इथचें तिथचें प्यालो पाणी
लहान शमली परी न अजुनी
ती चाकोरी म्हणून त्यजुनी
चालत आलो या खडकाला ६

श्रद्धेचें गाठोडे पाठी
हाती धरिली कुदळ मोठी
मोल झऱ्याचें मला माहिती
दूरच मी, बाजार सोडिला ७

किशन पोहनेरकर,
बी. एस सी.

" माझी देशभक्ति अशी कांहीं एकांतिक वस्तु नाहीं. ती सर्व व्यापी आहे. सर्व जीवन व्यापी नसणारा धर्म अगर देशभक्ति माझी नव्हे. मी केवळ मानव प्राण्यांतच बंधुत्व भावना प्रस्थापित करूं इच्छितो असें नव्हे तर सकल प्राणी मात्रांत ऐक्य निर्माण करूं इच्छितो, त्या अवस्थेचा अनुभव घेऊं इच्छितो "

— महात्मा गांधी.

जयहिंद प्रिंटिंग प्रेस, १४५२/५, नारायणगुडा, हैद्राबाद-द.